स इदानीमहं वृद्धः परिहीनपराक्रमः।
सांप्रतं कालमस्माकं भवान्सर्वगुणान्वितः ३४
तद्विजृम्भस्व विक्रान्त प्लवतामुत्तमो ह्यसि।
त्वद्वीर्यं द्रष्टुकामा हि सर्वा वानरवाहिनी ३५
उत्तिष्ठ हरिशार्दूल लङ्घयस्व महार्णवम्।
परा हि सर्वभूतानां हनुमन्या गतिस्तव ३६
विषण्णा हरयः सर्वे हनुमन्किमुपेक्षसे।
विक्रमस्व महावेग विष्णुस्त्रीन्विक्रमानिव ३७
ततः कपीनामृषभेण चोदितः प्रतीतवेगः पवनात्मजः कपिः।
प्रहर्षयंस्तां हरिवीरवाहिनीं चकार रूपं पवनात्मजस्तदा ३८

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदि० किष्किं० षट्षष्टितमः सर्गः ॥ ६६ ॥ [२७३१]

---

सामर्थ्य मोठें होतें. ३३ परंतु, सध्या मी आतां वृद्ध झालों असून माझ्या अंगीं पराक्रम मुळींच राहिला नाहीं. सांप्रत काळीं आह्मामध्यें तूंच सर्वगुणसंपन्न आहेस. ३४

तस्मात्, हे पराक्रमी हनुमाना, स्वतःचे अंगीं जें काय बल असेल तें तूं प्रकट कर. उड्डाण मारण्याच्या सामर्थ्यांत श्रेष्ठ तूंच आहेस आणि सर्व वानरसेना तुझें सामर्थ्य अवलोकन करण्यास उत्सुक झाली आहे. ३५ तस्मात्, हे वानरश्रेष्ठा ऊठ आणि महासागर उल्लंघन कर. हे हनुमाना, सर्व प्राण्यांपेक्षा तुझी गति अधिक आहे. ३६ हे हनुमाना, सर्व वानर खिन्न होऊन बसले आहेत आतां तूं का बरें याचा अंत पहात आहेस? हे महावेगवान् हनुमाना, विष्णूनें ज्याप्रमाणें तीन पावलें टाकिलीं त्याप्रमाणें तूं आतां मजीचें अवलंबन कर." ३७ ह्याप्रमाणें वानरश्रेष्ठ जांबवानानें हनुमानाला प्रेरणा केली असतां स्वतःच्या वेगासंबंधानें खात्री असलेल्या त्या वानरवीराच्या सेनेला हर्ष उत्पन्न करीत करीत प्रचंड रूप धारण केलें. ३८

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६६ ॥

अम्बरीषोपमं दीप्तं विधूम इव पावकः ७
हरीणामुत्थितो मध्यात्संप्रहृष्टतनूरुहः ।
अभिवाद्य हरीन्वृद्धान्हनूमानिदमब्रवीत् ८
आरुजन्पर्वताग्राणि हुताशनसखोऽनिलः ।
बलवानप्रमेयश्च वायुराकाशगोचरः ९
तस्याहं शीघ्रवेगस्य शीघ्रगस्य महात्मनः ।
मारुतस्यौरसः पुत्रः प्लवेनेनास्ति तत्समः १०
उत्सहेयं हि विस्तीर्णमालिखन्तमिवाम्बरम् ।
मेरुं गिरिमसङ्गेन परिगन्तुं सहस्रशः ११
वेगप्रणुन्नेन सागरेणाहमुत्सहे ।
समाप्लावयितुं लोकं सपर्वतनदीह्रदम् १२
ममोरुजङ्घावेगेन भविष्यति समुत्थितः ।
समुत्थितमहाग्राहः समुद्रो वरुणालयः १३
पन्नगाशनमाकाशे पतन्तं पक्षिसेवितम् ।
वैनतेयमहं शक्तः परिगन्तुं सहस्रशः १४

भट्टीप्रमाणें शोभूं लागलें आणि तो स्वतः धूमरहित अग्नीप्रमाणें दिसू लागला ७ नंतर शरीरावर रोमांच उठलेला तो हनूमान् वानरांमधून उठला आणि वृद्ध वानरांना अभिवंदन करून म्हणाला ८ " आकाशामध्यें संचार करणारा वायु अतर्क्य, बलाढ्य, गमनशील व पर्वतशिखरें फोडून टाकणारा असून अग्नीचा सखा आहे ९ आणि त्या शीघ्र वेगानें युक्त व शीघ्रगामी महात्म्या वायूचा मी औरस पुत्र असून उडी मारण्यांत त्याची बरोबरी करणारा आहें. १० गगनचुंबित विस्तीर्ण मेरुपर्वताला मध्यें कोठेंही न थांबता एकदम हजारों प्रदक्षिणा करण्यास मी समर्थ आहें. ११ बाहूंच्या वेगामुळें सागर क्षुब्ध करून टाकून त्याच्या योगानें पर्वत, नद्या व सरोवरें ह्यांसहवर्तमान सर्व जगत् बुडवून टाकण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे १२

माझ्या मांड्यांच्या व पोटऱ्यांच्या वेगानें वरुणालय असलेला समुद्र मर्यादेचें अतिक्रमण करून जाईल आणि त्यांतील मोठमोठे मकर क्षुब्ध होऊन जातील. १३ आकाशामध्यें उड्डाण करणाऱ्या सर्पभक्षक पक्षिराज गरुडापेक्षा एकदम हजारों-

उदयात्प्रस्थितं वापि ज्वलन्तं रश्मिमालिनम् ।
अनस्तमितमादित्यमहं गन्तुं समुत्सहे १५
ततो भूमिमसंस्पृश्य पुनरागन्तुमुत्सहे ।
प्रवेगेनैव महता भीमेन प्लवगर्षभाः १६
उत्सहेयमतिक्रान्तुं सर्वानाकाशगोचरान् ।
सागरान्क्षोभयिष्यामि दारयिष्यामि मेदिनीम् १७
पर्वतांश्चूर्णयिष्यामि प्लवमानः प्लवंगमः ।
हरिष्याम्युरुवेगेन प्लवमानो महार्णवम् १८
लतानां विविधं पुष्पं पादपानां च सर्वशः ।
अनुयास्यति मामद्य प्लवमानं विहायसा ।
भविष्यति हि मे पन्थाः स्वातेः पन्था इवाम्बरे १९
चरन्तं घोरमाकाशमुत्पतिष्यन्तमेव च ।
द्रक्ष्यन्ति निपतन्तं च सर्वभूतानि वानराः २०

---

पर्यंत गमन करण्यास मी समर्थ आहें. १४ किरणसमुदायांनीं युक्त असलेला उज्ज्वल सूर्य उदयाचलापासून निघाल्यानंतर अस्ताचलाला जाण्याचें पूर्वींच मी येथून जाऊन त्याला स्पर्श करण्यास समर्थ आहें. १५ इतकेंच नव्हे; परंतु, हे वानरश्रेष्ठहो, सूर्याला स्पर्श केल्यानंतर पुनरपि भूमीपर्यंत येऊन तिला स्पर्श न करितां माझ्या प्रचंड वेगानें मी पुनरपि सूर्याला स्पर्श करण्यास समर्थ आहें. १६

आकाशामध्यें दिसणाऱ्या सर्व ग्रहनक्षत्रादिकांचें उल्लंघन करण्यास मी समर्थ आहें आणि वेळ पडली असतां सागर शुष्क करून पृथ्वीही विदीर्ण करणारा आहें. १७ मी वानर उड्या मारूं लागलों असतां पर्वतांचें चूर्ण करून टाकीन आणि उड्या मारितां मारितां आपल्या मांड्यांच्या वेगानें महासागरालाही मागोमाग ओढून नेईन. १८ मी आज आकाशमार्गानें उड्डाण करूं लागलों असतां लता व वृक्ष यांचीं नाना प्रकारचीं पुष्पें माझ्या मागोमाग येऊं लागतील आणि असें होऊं लागलें असतां आकाशामध्यें असलेल्या स्वातीच्या मार्गाप्रमाणें माझा मार्ग दिसूं लागेल. १९ हे वानरहो, सर्व प्राणी भयंकर रूप धारण करणाऱ्या मला आज मार्गामध्यें संचार करीत असतांना, आकाशामध्यें उड्डाण करीत असतांना आणि समुद्राच्या पैलतीरावर उतरीत असतांना अवलोकन करितील. २०

महामेरुप्रतीकाशं मां द्रक्ष्यध्वं प्लवंगमाः ।
दिवमावृत्य गच्छन्तं ग्रसमानमिवाम्बरम् २१
विधमिष्यामि जीमूतान्कम्पयिष्यामि पर्वतान् ।
सागरं शोषयिष्यामि प्लवमानः समाहितः २२
वैनतेयस्य वा शक्तिर्मम वा मारुतस्य वा ।
ऋते सुपर्णराजानं मारुतं वा महाबलम् २३
न तद्भूतं प्रपश्यामि यन्मां प्लुतमनुव्रजेत् २४
निमेषान्तरमात्रेण निरालम्बनमम्बरम् ।
सहसा निपतिष्यामि घनाद्विद्युदिवोत्थिता २५
भविष्यति हि मे रूपं प्लवमानस्य सागरम् ।
विष्णोः प्रक्रममाणस्य तदा त्रीन्विक्रमानिव २६
बुद्ध्या चाहं प्रपश्यामि मनश्चेष्टा च मे तथा ।
अहं द्रक्ष्यामि वैदेहीं प्रमोदध्वं प्लवंगमाः २७
मारुतस्य समो वेगे गरुडस्य समो जवे ।

हे वानरहो, मी आज आकाश व्याप्त करून जाऊं लागलों असतां आकाश ग्रस्त करणारा प्रचंड मेरुपर्वतच की काय असा तुम्ही मला अवलोकन कराल. २१ मी मन स्वस्थ करून उड्डाण करूं लागलों असतां मेघ उडवून देईन, पर्वत कंपित करीन आणि सागर शुष्क करून टाकीन २२ हें सामर्थ्य गरुडाचे ठिकाणीं, माझ्या अंगीं अथवा वायूपाशींच आहे मी उडी मारिली असतां माझ्या मागोमाग येणारा गरुडाशिवाय अथवा महाबलाढ्य वायूशिवाय दुसरा कोणताही प्राणी मला दिसत नाहीं. २३, २४ मेघापासून निघालेल्या विद्युल्लतेप्रमाणें एका निमेषामध्यें मी निराधार आकाशांत एकदम उडून जाईन २५ आणि मी सागराचें उल्लंघन करूं लागलों असतां तीन पावलांनीं त्रैलोक्य व्याप्त करण्यास उद्युक्त झालेल्या विष्णूप्रमाणें माझें रूप होईल. २६

हे वानरहो, तुम्ही आनंदित व्हा, मी सीतेचा शोध लावीन कारण, माझ्या बुद्धीला तसें वाटत असून माझ्या मनाचाही कल तसाच दिसत आहे २७ वेगामध्यें वायूची व गरुडाची बरोबरी करणारी मी एकदम दहा हजार योजनेंही

अयुतं योजनानां तु गमिष्यामीति मे मतिः २८
वासवस्य सवज्रस्य ब्रह्मणो वा स्वयंभुवः ।
विक्रम्य सहसा हस्तादमृतं तदिहानय ।
लङ्कां वापि समुत्क्षिप्य गच्छेयमिति मे मतिः २९
तमेवं वानरश्रेष्ठं गर्जन्तममितप्रभम् ।
प्रहृष्टा हरयस्तत्र समुदैक्षन्त विस्मिताः ३०
तथास्य वचनं श्रुत्वा ज्ञातीनां शोकनाशनम् ।
उवाच परिसंहृष्टो जाम्बवान्प्लवगेश्वरः ३१
वीर केसरिणः पुत्र वेगवन्मारुतात्मज ।
ज्ञातीनां विपुलः शोकस्त्वया तात प्रणाशितः ३२
तव कल्याणरुचयः कपिमुख्याः समागताः ।
मङ्गलान्यर्थसिद्ध्यर्थं करिष्यन्ति समाहिताः ३३
ऋषीणां च प्रसादेन कपिवृद्धमतेन च ।
गुरूणां च प्रसादेन संप्लुप त्वं महार्णवम् ३४

---

उडीमरता निघून जाईन असें मला वाटतें. २८ वज्रपाणि इंद्राच्या अथवा स्वयंभू महादेवाच्या हातांत जर अमृत असेल तर मी आपला पराक्रम गाजवून तें एकाएकीं येथे घेऊन येईन आणि कदाचित् लंकाही उपटून चालता होईन असें मला वाटतें. " २९

याप्रमाणें तो अतुल तेजस्वी वानरश्रेष्ठ हनुमान् गर्जना करीत असतांना तेथें असलेले सर्वही वानर आनंदित व विस्मित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले ३० आणि जातभाईंच्या दु:खाचा परिहार करणारें तें त्याचें भाषण श्रवण करून वानराधिपति जांबवानाला फारच हर्ष झाला व तो म्हणाला ३१ " हे वेगयुक्त वीरा, हे वायुनंदना केसरीपुत्रा, जातभाईंचें प्रचंड दु:ख तूं नाहींसें केलेंस. ३२ तुझा मनोरथ सिद्धीस जाण्याकरितां येथें जुळलेले मुख्य मुख्य मंगलप्रिय वानर तुझें मंगल करितील. ३३ ऋषींचा प्रसाद, वानरवृद्धांचा आशीर्वाद आणि गुरुजनांची कृपा यांच्या योगानें तूं महासागर उल्लंघून जाशील. ३४ तूं परत येईपर्यंत

स्थास्यामश्चैकपादेन यावदागमनं तव ।
त्वद्गतानि च सर्वेषां जीवनानि वनौकसाम् ३५
ततश्च हरिशार्दूलस्तानुवाच वनौकसः ।
कोपि लोके न मे वेगं प्लवने धारयिष्यति ३६
एतानीह नगस्यास्य शिलासंकटशालिनः ।
शिखराणि महेन्द्रस्य स्थिराणि च महान्ति च ३७
येषु वेगं गमिष्यामि महेन्द्रशिखरेष्वहम् ।
नानाद्रुमविकीर्णेषु धातुनिष्पन्दशोभिषु ३८
एतानि मम वेगं हि शिखराणि महान्ति च ।
प्लवतो धारयिष्यन्ति योजनानामितः शतम् ३९
ततस्तु मारुतप्रख्यः स हरिर्मारुतात्मजः ।
आरुरोह नगश्रेष्ठं महेन्द्रमरिमर्दनः ४०
वृतं नानाविधैः पुष्पैर्मृगसेवितशाद्वलम् ।
लताकुसुमसंबाधं नित्यपुष्पफलद्रुमम् ४१

आम्ही अगदीं एका पायावर ( तुझी वाट पहात ) उभे राहूं सर्व वानरांचे प्राण तुझ्यावर अवलंबून आहेत " ३५

तदनंतर-वानरश्रेष्ठ हनुमान् त्या वनवासी वानरांना म्हणाला " उड्डाण करीत असताना वेगानें माझी बरोबरी करणारा जगतामध्यें कोणीही नाहीं ३६ शिलासमुदायानीं युक्त असलेल्या ह्या महेंद्रपर्वताचीं हीं शिखरं मोठीं मोठीं असून अचल आहेत. ३७ नाना प्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त आणि धातुसमुदायानीं सुशोभित असलेल्या ह्या महेंद्रपर्वताच्या शिखरावर मी वेगानें गमन करीन. ३८ कारण, येथून शंभर योजनें जरी उडी मारिली तरी हीं प्रचंड शिखरें मी उडी मारीत असताना माझा वेग सहन करितील " ३९. असें सांगितल्यानंतर तो वायुतुल्य व वायुपुत्र शत्रुनाशक हनुमान् महेंद्रनामक श्रेष्ठ पर्वतावर आरूढ झाला. ४०

तो पर्वत नानाप्रकारच्या पुष्पांनीं व्याप्त झालेला होता, तेथील तृणयुक्त प्रदेशावर मृगानीं वास्तव्य केलेलें होतें, लता व पुष्पें ह्यांनीं तो गजबजलेला होता आणि ते मीं प्रफुल्लित व फलयुक्त असणाऱ्या वृक्षांनीं तो भरून गेलेला होता. ४१

सिंहशार्दूलसहितं मत्तमातङ्गसेवितम् ।
मत्तद्विजगणोद्घुष्टं सलिलोत्पीडसंकुलम् ४२
महाद्रिरुच्छ्रितैः शृङ्गैर्महेन्द्रस्य महाबलः ।
विचचार हरिश्रेष्ठो महेन्द्रसमविक्रमः ४३
बाहुभ्यां पीडितस्तेन महाशैलो महात्मना ।
ररास सिंहाभिहतो महान्मत्त इव द्विपः ४४
मुमोच सलिलोत्पीडान्विप्रकीर्णशिलोच्चयः ।
वित्रस्तमृगमातङ्गः प्रकम्पितमहाद्रुमः ४५
नानागन्धर्वमिथुनैः पानसंसर्गकर्कशैः ।
उत्पतद्भिर्विहङ्गैश्च विद्याधरगणैरपि ४६
त्यज्यमानमहासानुः संनिलीनमहोरगः ।
शैलशृङ्गशिलोत्पातस्तदाभूत्स महागिरिः ४७

---

सिंह व व्याघ्र प्राणी तो युक्त होता, मत्त गजांनीं त्याचा आश्रय केलेला होता, मदमत्त पक्षिगणांनीं तो नादित करून टाकिलेला होता आणि झऱ्यांच्या योगानें तो गजबजून गेलेला होता. ४२ असा तो इंद्रतुल्यपराक्रमी, महाबलाढ्य व उन्नत वानरश्रेष्ठ हनुमान् महेंद्रपर्वताच्या मोठमोठ्या शिखरांवरून संचार करूं लागला. ४३ सिंहाचा तडाका बसला असतां मोठा मत्त गज ज्याप्रमाणें गर्जना करितो त्याप्रमाणें त्या महात्म्यानें आपल्या बाहूंनीं तो महापर्वत आवळून धरिला असतां ( प्राण्यांच्या द्वारानें ) तो आक्रोश करूं लागला. ४४ इतकेंच नव्हे; परंतु, हनुमानानें तो पर्वत आवळून धरिल्यामुळें त्याच्यावरील पाषाण-समुदाय अस्ताव्यस्त पडले, मृग व गज अगदीं त्रस्त होऊन गेले, मोठमोठे वृक्ष कंपित होऊं लागले आणि शेवटीं त्या पर्वतापासून जलप्रवाहही वाहूं लागले. ४५

पान आणि विषयोपभोग ह्यांविषयीं अत्यंत आसक्त असलेलीं गंधर्वांचीं अनेक जोडपीं, उड्डाण करणारे पक्षी आणि विद्याधरांचेही समुदाय ४६ त्या पर्वतावरील मोठमोठीं शिखरें सोडून जाऊं लागले, मोठमोठे भुजंग दडून बसूं लागले आणि त्या महापर्वतावरील शिखरें व शिला ह्यांचेंही पतन होऊं लागलें. ४७ चित्रांतून

नि श्वसद्भिस्तदा तैस्तु भुजगैरर्धनिःसृतैः ।
सपताक इवाभाति स तदा धरणीधरः ४८

ऋषिभिस्त्राससंभ्रान्तैस्त्यज्यमानः शिलोच्चयः ।
सीदन्महति कान्तारे सार्थहीन इवाध्वगः ४९

स वेगवान्वेगसमाहितात्मा हरिप्रवीरः परवीरहन्ता ।
मनः समाधाय महानुभावो जगाम लङ्कां मनसा मनस्वी ५०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदि० किष्किन्धा० सप्तषष्टितमः सर्गः ॥६७॥ [२४८१]

## ॥ समाप्तमिदं किष्किंधाकाण्डम् ॥

अर्धवट बाहेर निघून फुसकारे टाकू लागलेल्या भुजगांच्या योगानें तो पर्वत पताकांनीं युक्त असल्यासारिखा दिसू लागला ४८ आणि त्रासानें गोंधळून गेलेले ऋषि त्या पर्वताला सोडून जाऊं लागले असतां तो पर्वत प्रचंड अरण्यामध्यें साथ्यांतून चुकलेल्या मार्गस्थाप्रमाणें खिन्न दिसूं लागला. ४९ असो. चलाख आकृतीनें युक्त आणि शत्रुपक्षीय वीरनाशक असा जो महापराक्रमी, विचारी, वेगवान् आणि वानरश्रेष्ठ हनुमान् त्यानें मन स्वस्थ ठेवून लंकेचें स्मरण केलें ५०

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणरूपक आदिकाव्यांतील
किष्किंधाकांडांतील सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६७ ॥

॥ येथें किष्किंधाकांड संपूर्ण झालें ॥

श्री वाल्मीकि रामायणांतर्गत

# किष्किन्धा काण्डाची समालोचना

---

या किष्किन्धाकाण्डामध्यें कांहीं अत्यंत महत्वाच्या अशा राजकीय घडामोडी झालेल्या आहेत. त्याचें महत्त्व समजलें पाहिजे व त्याचे मागचे पुढचे धागेदोरेही समजणें आवश्यक आहे. यासाठीं या घडामोडींसंबंधानें चार शब्द येथें लिहिणें योग्य आहेत त्यात राजकीय सावधपणाला प्रथम स्थान देणें योग्य आहे. तो सावधपणा कसा असावा तें पहा—

## सुग्रीवाचा सावधपणा.
## परकीयांवर अविश्वास

सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर आपल्या मंत्र्यांसह सुरक्षित ठिकाणीं होता. रामलक्ष्मण हिंडता हिंडता त्या पर्वताजवळ आले. त्यांना सुग्रीवानें पाहिलें, धिप्पाड शरीर, सुन्दर देहकान्ती, तेजस्वी व ओजस्वी चेहरा, शौर्यवीर्य धैर्याचा जणूं पुतळाच, अशा त्या रामलक्ष्मणांना पाहून सुग्रीवाला प्रथम शंका आली, ती ही कीं " याना आपला शत्रु जो वाली त्यानें आपणास मारण्यासाठीं पाठवलें आहे."

वरायुधधरौ वीरौ सुग्रीवः शंकितोऽभवत् ॥ १ ॥
एतौ वनमिदं दुर्गं वालिप्रणिहितौ ध्रुवम् ॥ ६ ॥ कि० स० २

'हे वीर निःसशय वालीनें पाठवले आहेत 'विश्वस्तेऽपि न विश्वसेत्।' अगदीं विश्वासातील माणसावरही विश्वास ठेऊं नये, मग एकदम बाहेरचा जो

माणूस आला असेल त्यावर विश्वास ठेऊं नये हें काय सांगितलें पाहिजे ? राजकारणामध्यें हा असा सावधपणा ठेवणें योग्य आहे.

भारतवर्षामध्यें अनादि कालापासून बाहेरचे असुर, दानव व राक्षस येथें येत व भारतीय आर्य त्यावर विश्वास ठेवीत व शेवटीं फसत असत. तसें न करता या सुग्रीवानें येथें आपला सावधपणा दाखवला आहे. राजकारणामध्यें असा सावधपणा दाखवला पाहिजे.नवा माणूस दिसला तर त्यावर प्रथम कधींहि विश्वास ठेऊं नये. त्या संबंधानें सावध रहावें, आपलें सरक्षण होईल असें करावें. मग तो आलेला परका माणूस हितकारक ठरला तरीसुद्धा उत्तम रीतीनें त्याची परीक्षा करून मग त्यावर विश्वास ठेवावा.

न ह्यबुद्धिगतो राजा सर्वभूतानि शास्ति हि ॥ १८॥ कि० स० २

'बुद्धिचें अवलंबन न करणारा कोणताही राजा आपल्या प्रजेवर नीट रीतीनें राज्य करूं शकत नाहीं.' म्हणून नेहमीं बुद्धीचा उपयोग करून वागावें.सुग्रीवाचा मंत्री हनुमान यानें सुग्रीवाला सांगितलें कीं, या ऋष्यमूक पर्वतावर वाली येऊं शकत नाहीं, तेव्हां भिण्याचें कारण नाहीं. यावर वाली पुन सावधपणानें म्हणतो–

वालिप्रणिहितावेव शङ्केऽहं पुरुषोत्तमौ।
राजानो बहुमित्राश्च विश्वासो नात्र हि क्षमः ॥ २१ ॥
अरयश्च मनुष्येण विज्ञेयाः छन्नचारिणः ।
विश्वस्तानामविश्वस्ताश्छिद्रेषु प्रहरन्त्यपि ॥ २२ ॥
कृत्येषु वाली मेधावी राजा नो बहुदर्शिनः ।
भवन्ति परहन्तारस्ते ज्ञेयाः प्राकृतैर्नरैः ॥ २३ ॥ कि० स० २

"वालीनेंच याना पाठवलें आहे असा मला संशय येत आहे राजे लोकांना पुष्कळ मित्र असतात म्हणून हेहीं वालीचे मित्र असतील. यासाठीं यांच्याविषयीं सावध राहणेंच योग्य आहे कपटानें हिंडत असणारे शत्रु मनुष्यानें ओळखले पाहिजेत. जर आपण यावर परीक्षा न करिता विश्वास ठेवला, तर हे केव्हां घात करतील तें समजण्यासुद्धा नाहीं. राजा वाली या कामामध्यें फार

बुद्धिमान आहे. तो प्रतिपक्षाला फसवून त्याचा घात करण्यामध्यें अत्यंत कुशल आहे." यासाठी आपण या वीरांबद्दल सावध असलें पाहिजे.

असें म्हणून सुग्रीवानें हनुमानाला रामलक्ष्मणांजवळ पाठवलें व त्यास त्यांची उत्तम परीक्षा करून ये असें सांगितलें.

राजकारणांत हा सावधपणा राखणें फारच आवश्यक आहे. हा बोध या ठिकाणीं आपणांस मिळतो.

## कामवश झालेला तरुण

सीतेला रावणानें हरण करून नेल्यानंतर स्वाभाविकपणेंच सीतेची आठवण होऊन रामाला दुःख होत राहणें स्वाभाविकच होतें. अपहृत स्त्रियांच्या पतींचीं दुःखें कशीं असतात, तें अपहृतांचें पतिच जाणूं शकतील. येथें श्रीरामाची स्थिति अशीच झालेली दिसत आहे. पहा–

स कामवशमापन्नः सौमित्रिमिदमब्रवीत् ॥ ९ ॥
मां हि शोकसमाक्रान्तं संतापयति मन्मथः ॥ ११ ॥
प्रवदन् मन्मथाविष्ट शोचयिष्यति लक्ष्मण ॥ १४ ॥
स्यन्दन्ति पादपाश्चेमे मम अनंगप्रदीपकाः ॥ १९ ॥
मन्मथायास संभूतो वसन्तगुणवर्धितः।
अयं मां धक्ष्यति क्षिप्रं शोकाग्निर्न चिरादिव ॥ ३३ ॥
मन्मथाभिपरीतस्य मम मन्मथवर्धनाः।
पश्य लक्ष्मण नृत्यन्तं मयूरमुपनृत्यति ॥ ३८ ॥
ममाप्येवं विशालाक्षी जानकी जातसंभ्रमा।
मदनेनाभिवर्तेत यदि नापहृता भवेत् ॥ ४३ ॥
नंदन्ति कामं शकुना मुदिता· संघशः कलम्।
आह्वयन्त इवान्योन्यं कामोन्मादकरा मम ॥ ४६ ॥
पश्य लक्ष्मण संनादं वने मदविवर्धनम्।
पुष्पिताग्रेषु वृक्षेषु द्विजानामवकूजताम् ॥ ५७ ॥

शक्यो धारयितु कामो भवेदभ्यागतो मया।
यदि भूयो वसन्तो मां न हन्यात् पुष्पितद्रुमः ॥ ६९॥
प्राप्य दु खं वने श्यामा मां मन्मथविकार्शितम्।
नष्टदु खेव हृष्टेव साध्वी साध्वभ्यभाषत ॥ ११२॥

वा० रा० किष्किंधा० १

' या वनामध्यें नाचत असलेले मोर पाहून, प्रफुल्लित झालेले वृक्ष पाहून, पक्ष्यांची जोडपीं पाहून, आरवत असलेले कोंबडे पाहून, वृक्षावर चढलेल्या वेली पाहून, वसन्ताचा बहार पाहून रामाला सीतेचें स्मरण होई व त्यामुळें रामाचा शोक वाढत असे " स्वाभाविकच आहे. बलवान्, सामर्थ्यशाली, पराक्रमी, युद्धामध्यें विजयी, ज्ञानी, शूर असा राम होता कोणत्याही उत्तम गुणाची न्यूनता ज्याच्यामध्यें नव्हती अशा रामाची प्रिय पत्नी दुष्टानीं पळवून नेली. कोणी नेली हें समजेना, कोठें ठेवली आहे तें कळेना, तिची व्यवस्था काय होत आहे तें ध्यानीं येईना. अशा स्थितींत तरुण पतिव्या मनाला ज्या वेदना होत असतील त्या वेदना रामाच्या अन्तःकरणाला या वेळीं होत आहेत व त्या वेदनानीं त्याचें मन होरपळून जात आहे. या ठिकाणचा ' काम ' हा नेहमींचा काम नव्हे. प्रिय पत्नीचा वियोग तर यात आहेच. पण त्या बरोबर शत्रूच्या घरात आपल्या प्राणाहून प्रिय पत्नीच्या होत असलेल्या हालाचें स्मरण होऊन जे क्लेश होत असतात, ते क्लेशही येथें रामाला त्रास देत आहेत.

ज्याच्या ज्याच्या स्त्रिया, बहिणी, आया व मुली अपहृत झाल्या असतील, त्याचेही असेच क्लेश आहेत. गत २१४ वर्षांत आपल्या हजारों आयाबहिणी, मुली अपहृत झालेल्या आहेत व यांचे क्लेशही असेच आहेत. या ठिकाणचे रामाचे शब्द आजच्या अपहृत स्त्रियांच्या संबंधीवाल्या शब्दासारखेच आहेत. अपहृत स्त्रियांच्या संबंधीयांची दुःखें हिंदूराष्ट्र कां बरें घेत आहेत याचा विचार आपण केला पाहिजे. हिंदूंनी कोणत्याही स्त्रिया आपल्या घरात घेतलेल्या नाहींत. इतकेंच काय पण हिंदु गृहव्यवस्था व जातिव्यवस्था अशी आहे कीं त्या जातिव्यवस्थेमुळें दुसऱ्या जातींची स्त्री हिंदूंच्या घरात राहणेंच शक्य नाहीं.

त्यामुळें हिंदुस्थानांत आजपर्यंत अपहृत स्त्री आलेली नाहीं असें म्हणता येईल. पण हिंदु स्त्रियांचें अपहरण मात्र राक्षस करीत आले आहेत. रामायणांतहि रावणानें अनेक आर्य स्त्रियांचें अपहरण केलेलें होतें व कृष्णायनांतहि अनेक स्त्रियांचें सामुदायिक अपहरण झालेलें होतें. यानंतरच्या काळामध्यें विशेषतः यावनी आक्रमणाच्या काळामध्यें पुष्कळ हिंदु स्त्रियांचें अपहरण झालेलें आहे असें कां होतें याचा विचार केला पाहिजे.

## लक्ष्मणाची अक्षम्य चूक

सीतेचें अपहरण जर लक्ष्मणानें आज्ञाभंग केला नसता तर झालें नसतें. रामानें सीतेचें संरक्षण करण्याचें काम करण्यासाठीं लक्ष्मणाला येथें रहा अशी आज्ञा केलेली होती. ही लष्करी-सैनिकीय आज्ञा होती. ती त्यानें पाळली असती तर सीतेचें अपहरण झालेंच नसतें ही गोष्ट खरी आहे कीं मारीचानें कपटानें आरोळ्या मारल्या. त्यामुळें सीतेला भ्रम झाला व ती लक्ष्मणाला अपशब्द बोलली व ते लक्ष्मणाला सहन झाले नाहींत व लक्ष्मण निघून गेला. पण रामलक्ष्मण सीता वनांत होते घरांत नव्हते. म्हणून नागरिक नियम येथें लागू होणार नाहींत

हे वनामध्यें होते. चारही बाजूंना राक्षसांचें भय होतें हें मत आहे हें या लक्ष्मणाला माहीत होतें. रामानें या भयाचा उच्चार करून येथें राहून सीतेचें संरक्षण कर असें सांगितलें होतें. ऋषींचा संहार राक्षस करीत आहेत, हें लक्ष्मणानें पाहिलें होतें. आपण येथून निघून गेलों तर सीतेचें संरक्षण होणार नाहीं हें लक्ष्मणाला माहीत होतें. अशी ही युद्धजन्य परिस्थितिप्रमाणें युद्ध परिस्थिति येथें होती. अशा वेळीं सीता अविचारानें अपशब्द बोलली, बोलूं नये तें बोलली, तरी तेवढ्यामुळें आपण आपल्या जागेवरून निघून जाणें हें सैनिकीय आज्ञेचा भंग करण्याप्रमाणें होतें. लक्ष्मणानें रामाची आज्ञा पालन केली नाहीं म्हणून सीतेचें अपहरण झालें ही गोष्ट सत्य आहे. सीतेच्या अपशब्दांनी जे मन लक्ष्मणाच्या अन्तःकरणास झाले असतील ते त्यानें सहन करून तेथें राहिलें पाहिजे होतें.

स्त्रियांचीं अपहरणें पुरुषांच्या निर्बलतेमुळें होत असतात. आपल्यामधील

दोषामुळें होत असतात हें हिंदूंनीं जाणलें पाहिजे. श्रीरामाच्या व श्रीकृष्णाच्या वेळेपासून आर्य स्त्रियांचें अपहरण होत आलें आहे. राक्षस, असुर, दानव हे कांहीं भारत वर्षांतील रहाणारे नव्हते. ते दुसऱ्या देशांतील होते. त्यांनी येथें यावें, येथें सुखानें व निर्भयतेनें रहावें व येथील स्त्रियांचें अपहरणही करावें व आम्ही हें काय चाललें आहे त्याकडे पाहूंही नये. स्त्री अपहृत झाली म्हणजे ती आपल्या समाजास मुकली म्हणून ती असुरास अर्पण करावी. अशी स्थिति फार प्राचीन कालापासून या भारत देशांत चालत आलेली आहे याचा विचार झाला पाहिजे

श्री भगवान् राम कृष्णांनी अपहरण करणाराचीं पाळेंमुळें खणून काढलीं, हें उत्तमच झालें. पण तो बोध या देवांच्या उपासकांनीं आपलासा केलेला नाहीं हीच दुःखाची गोष्ट आहे.

## हनुमानाची विद्वत्ता

सुग्रीव चा मंत्री हनुमान रामलक्ष्मणाकडे आला व त्यांच्याशीं बराच वेळ गोष्टी बोलत होता. यांच्या भाषणाचा श्रीरामचन्द्रावर किती उत्तम परिणाम झाला तें पहा—

सचिवोऽयं कपीन्द्रस्य सुग्रीवस्य महात्मनः ॥ २६ ॥
नानृग्वेदविनीतस्य नायजुर्वेदधारिणः ।
नासामवेदविदुषः शक्यमेवं विभाषितुम् ॥ २८ ॥
नूनं व्याकरणं कृत्स्नमनेन बहुधा श्रुतम् ।
बहुव्याहरतानेन न किंचिदपभाषितम् ॥ २९ ॥
न मुखे नेत्रयोश्चापि ललाटे च भ्रुवोस्तथा ।
अन्येष्वपि च सर्वेषु दोषः संविदितः क्वचित् ॥ ३० ॥
अविस्तरमसंदिग्धमविलम्बितमव्ययम् ।
उरस्थं कण्ठगं वाक्यं वर्तते मध्यमस्वरम् ॥ ३१ ॥
उच्चारयति कल्याणीं वाचं हृदयहर्षिणीम् ।
अनया चित्रया वाचा त्रिस्थानव्यंजनस्थया ॥ ३२ ॥

कस्य नाराध्यते चित्तं उद्यतासेररेरपि ॥ ३३ ॥
एवंविधो यस्य दूतो न भवेत् पार्थिवस्य तु ।
सिध्यन्ति हि कथं तस्य कार्याणां गतयोऽनघ ॥ ३४ ॥
किं० स० ३

' हे लक्ष्मणा ! हा वानरराज सुग्रीवाचा मंत्री माझ्याजवळ आला आहे. ज्यानें ऋग्वेदाचें अध्ययन केलेलें नाहीं, जो यजुर्वेद धारण करीत नाहीं, जो सामवेद जाणत नाहीं त्याला असें भाषण करता येणें शक्य नाहीं यानें संपूर्ण व्याकरणाचें अध्ययन केलेलें आहे. इतका वेळ हा भाषण करीत असतांही एक-सुद्धा अशुद्ध याच्या तोंडांतून निघालेलें नाहीं याच्या मुख, ललाट, भिवया, तोंड व इतर अवयव यात कोठेंही दोष नाहीं. याचें भाषण फारच लांबलचक नाहीं, संदिग्ध नाहीं, अस्खलित असून ऐकणाऱ्यांना याचा कंटाळा येत नाहीं. हा मध्यम स्वरानें बोलत आहे. उगीच मोठ्या ओरडा नाहीं किंवा ऐकूं न येईल असेंही अस्पष्ट नाहीं असा हा दूत कोणाचें चित्त आकर्षण करून घेणार नाहीं ? तलवार उगारून शत्रु जरी आला तरी तो याचें भाषण ऐकतांच स्तब्ध होईल ! ! असा योग्य दूत ज्या राजाजवळ असेल त्याची इतें निःसंशय सिद्धीस जाणारच ' दूत असावा तर हा असा असावा

या रामचंद्राचर हनुमानाच्या बोलण्याचा असा परिणाम झाला. हनुमानाची विद्वत्ता यावरून फार मोठी होती असें दिसतें. वानर राज्यांतील मंत्र्याची विद्वत्तेची पातळी यावरून किती उच्च होती तें समजून येतें.

या देशचे सभ्य लोक मध्यम स्वरात बोलत असत व उगाच हातवारे करणें, भिवया उडवणें, डोळे मिचकावणें असल्या वाईट सवयी यामध्यें नसत राज्यशासनामधील अधिकार व राजदूताच्या स्थानावर वानरराज्यातही फार विद्वान माणसांची नेमणूक होत असे हे यावरून दिसून येत आहे.

## रामाची दीनता

हनुमान सुग्रीवाचा मंत्री रामाकडे आला व त्यानें रामाशीं भाषण केलें व सुग्रीवाचा परिचय करून दिला तेव्हां लक्ष्मण त्याला म्हणाला कीं हा राम वास्त-

विक राजा असताही सुग्रीवाला मित्र बनवण्याच्या इच्छेनें त्याला शरण येत आहे-

> अहं चैव च रामश्च सुग्रीवं शरणं गतौ ॥ १७॥
> एष दत्त्वा च वित्तानि प्राप्य चानुत्तमं यशः ।
> लोकनाथः पुरा भूत्वा सुग्रीवं नाथमिच्छति ॥ १८ ॥
> सीता यस्य स्नुषा चासीच्छरण्यो भक्तवत्सलः ।
> तस्य पुत्रः शरण्यस्य सुग्रीवं शरणं गतः ॥ १९ ॥
> सर्वलोकस्य धर्मात्मा शरण्यः शरणं पुरा ।
> गुरुर्मे राघवः सोऽयं सुग्रीवं शरणं गतः ॥ २० ॥
> यस्य प्रसादे सततं प्रसीदेयुरिमाः प्रजाः ।
> स रामो वानरेन्द्रस्य प्रसादमभिकांक्षते ॥ २१ ॥
> सुग्रीवं वानरेन्द्रं तु रामः शरणमागतः ॥ २३ ॥
> शोकाभिभूते रामे तु शोकार्ते शरणं गते ।
> कर्तुमर्हति सुग्रीवः प्रसादं सह यूथपैः ॥ २४ ॥ किं० स० ४

'मी लक्ष्मण व राम असे दोघेही आम्ही सुग्रीवाला शरण आलों आहोंत. रामानें पूर्वी ब्राह्मणांना अगणित द्रव्याचें दान केलेलें आहे व त्यामुळें त्याची उत्तम कीर्तिही झालेली होती, तसेंच हा राजाही सर्व त्रैलोक्याचा नाथ होता. पण दैवगति अशी विलक्षण फिरली कीं, त्या रामाला सुग्रीव आपला नाथ व्हावा अशी प्रार्थना करावी लागत आहे! दशरथासारख्या सम्राटाची सून सीता व त्या दशरथाचा पुत्र युवराज राम आज सुग्रीवाला शरण जात आहे. हा राम माझा ज्येष्ठ बंधु सर्व लोकांनीं शरण जाण्यास योग्य असताही सध्या दैवगति फिरल्यामुळें सुग्रीवाला शरण येत आहे. ज्याच्या प्रसादानें सर्व प्रजा आनंदित होत असत तो राम आज वानरराज सुग्रीवाच्या कृपेची इच्छा करीत आहे. शोकग्रस्त झालेला राम जर वानरराज सुग्रीवाला शरण आला आहे तर त्या दीन रामावर आपल्या सर्व सैन्यासहवर्तमान सुग्रीवानें कृपा करणेंच योग्य आहे.'

दैवगति फिरल्यामुळें प्रतापी वीरांना ही अशी शरणागति स्वीकारावी लागते. या वेळीं राम व लक्ष्मण या प्रतापी वीरांच्या अन्तःकरणांत किती असह्य वेदना होत असतील त्याचा ठसा या लक्ष्मणाच्या भाषणातील प्रत्येक शब्दात उठलेला आहे. रामाची स्त्री अपहृत झाली, तिचें स्मरण होताच रामाच्या अन्तःकरणात काय वेदना होत असतील बरें ? आपण या अरण्यात असहाय्य, सीतेला येथें शोधावयाची कोठें व कशी ? अशा वेळीं सुग्रीवासारखा वनाचा राजा जर मित्र झाला तर त्याच्या व त्याच्या सैन्याच्या सहाय्यानें सीतेला शोधणें व अपहरण करणाऱ्याचीं पाळेंमुळें खणून काढणें शक्य आहे. एकट्या रामलक्ष्मणाकडून या निबिड अरण्यात तें होणे शक्य नाहीं. या कारणामुळें ही दीनता या वेळी या समर्थ वीरांना सहन करावी लागली आहे

## समदुःखी वीरांची मैत्री

सुग्रीव हा वानरांचा राजा व राम हा आर्यांचा राजा. या दोघांचें सख्य समदुःखी झाल्यामुळें होत आहे. सुग्रीवाची बायको वालीनें त्याच्या भावानें हरपली होती व रामाची पत्नी सीता रावणानें चोरून नेली होती. दोघेही बायकोंचें अपहरण झाल्यामुळें समदुःखी होते. सुग्रीवाला राज्य नव्हतें. पण जें थोडासा वेळ मिळालें होतें तेंही त्याच्या भावानें बळकावलें होतें. रामाचा राज्याभिषेक व्हावयाचा त्याच दिवशीं त्याचा वनवास सुरू झाल्यानें रामाचेंही हातात आलेलें राज्य निघून गेलें होतें. मिळून दोघेही राज्यभ्रष्टतेच्या कारणानें समदुःखीच होते. रामही वनवासात आला होता व सुग्रीवही घरादारातून बाहेर हाकलला गेल्यामुळें वनवासातच होता. हेंही दोघांचें दुःख सारखेंच होतें. समदुःखी या ठिकाणीं एकत्र झाले. समदुःखी असलेल्यामध्यें लवकर मैत्री होते. त्याप्रमाणेंच या दोघांची मैत्री येथें ऋष्यमूक पर्वतावर झालेली आहे.

सुग्रीवाच्या पत्नीचें अपहरण त्याचा भाऊ वाली यानें केलें राज्यभ्रष्ट करून त्यानेंच त्याला वनवासात आश्रयास भाग पाडलें. यासाठीं रामानें सहाय्य करून वालीला मारून सुग्रीवाचें राज्य सुग्रीवाला द्यावें असें बोलणें हनुमानानें रामाशीं केलें. हनुमानानें सुग्रीव हा ( राज्याच्च विभ्रष्टः । कि. स. ४।२७ ) राज्या-

पासून भ्रष्ट झालेला आहे. हा या सुग्रीवावर वालीनें फार मोठा अन्याय केला आहे. असें जें भासविलें आहे तें केवळ राजकीय सत्य आहे. वास्तविक वाली वडील भाऊ असल्यानें राज्यावर अधिकार वालीचाच होता. सुग्रीव कांहीं कारणानें थोडा वेळ गादीवर आला होता इतकेंच. वास्तविक सुग्रीवाला गादी मिळणें शक्य नव्हतें. सुग्रीवही तसें म्हणत नाहीं. पण हा सुग्रीवाचा मंत्री रामाला वालीचा दोष रंगवून भडक करून सांगत आहे ! राजकीय डावपेंचाच्या दृष्टीनें हें योग्यच आहे. पण हें सत्य नव्हे. राजकारणांत इतकेंच सत्य असतें.

असो. या प्रमाणें समदुःखी राम व सुग्रीव याचें सख्य येथें घडत आहे. रामायणांतील ही फार मोठी घडामोड घडत आहे. या सख्यानें रामाला एका मोठ्या ससैन्य राजाची सहायता मिळत आहे. एकाकी व असहाय्य असलेला राम यावेळीं ससहाय्य व अधिक समर्थ होत आहे.

## हस्तपीडनानें सख्य

सख्य ज्यांच्यामध्यें व्हावयाचें असतें, ते प्रीतिनें दोघेही एकत्र येतात, हस्तान्दोलन करतात व मग त्या दोघांची प्रदीप्त अग्निपुढें मित्रत्वाची प्रतिज्ञा होते. अशी ही या कालांतील पद्धति येथें दिसत आहे. सुग्रीव म्हणत आहे .

यत् त्वं इच्छसि सौहार्दं वानरेण मया सह ॥ १० ॥
रोचते यदि मे सख्यं बाहुरेष प्रसारितः ॥
गृह्यतां पाणिना पाणिः मर्यादा बध्यतां ध्रुवा ॥ ११ ॥
एतत्तु वचनं श्रुत्वा सुग्रीवस्य सुभाषितम् ।
संप्रहृष्टमना हस्तं पीडयामास पाणिना ॥ १२ ॥
हृद्यं सौहृदमालम्ब्य पर्यष्वजत पीडितम् । कि० स० ५

' हे रामा ! माझ्याशीं सख्य करणें जर तुम्हांस बरें वाटत असेल, तर हा हात मी पुढें करीत आहें आपल्या हातानें हा माझा हात पकडा व एकमेकांचें कार्य शेवटास नेण्यासाठीं कधींही न बदलणाऱ्या अशा निश्चयाची प्रतिज्ञा विचारपूर्वक करावी ' हें सुग्रीवाचें भाषण रामानें ऐकलें, त्यामुळें रामाला फार आनंद

झाला, रामानें आपल्या हातानें सुग्रीवाचा हात पकडला व नंतर या आनंदाच्या भरात रामानें सुग्रीवाला प्रेमानें आलिंगन दिलें.

यानंतर हनुमानानें भिक्षुरूप टाकून वानररूप घेतलें व त्यानें दोन लाकडांचें घर्षण करून अग्नि उत्पन्न केला व—

ततोऽग्निं दीप्यमानं तौ चक्रतुश्च प्रदक्षिणम् ।
सुग्रीवो राघवश्चैव वयस्यत्वमुपागतौ ॥ १६ ॥ कि० स० ५

नंतर सुग्रीव व राम यांनीं त्या प्रदीप्त अग्नीला प्रदक्षिणा केली व आपण दोघे आजपासून मित्र झाल्याचा आनंद त्यावेळीं त्यांना झाला. अग्नि साक्षीनें होणारें सख्य दोघांनाही हितकारक असतें व तें कधींही मोडलें जात नाहीं. अग्नि पेटवून त्या अग्नीची त्या दोघांनीं पूजा केली आहे

दीप्यमानं ततो वह्निं पुष्पैरभ्यर्च्य सत्कृतम् । कि० स० ५।१५

प्रदीप्त अग्नीची फुलांनीं पूजा केली व त्या दोघांमध्यें त्या अग्नीला हनुमानानें ठेवलें. येथें फुलांनीं अग्नीची पूजा केल्याचा उल्लेख आहे व त्यांत कशाचीहि हवन केलें असा उल्लेख नाहीं. ज्या परिस्थितींत राम व सुग्रीव होते त्या परिस्थितीमध्यें हवनासाठीं घृत व हविष्यान्न मिळण्याचा संभव नव्हता. म्हणून यांनीं अग्निमध्यें घृतादिच हवन केलें नाहीं असें म्हणता येईल. पण पुष्पांनीं अग्नीची पूजा केल्याचा उल्लेख मात्र स्पष्ट आहे. कित्येक आधुनिक टीकाकार रामायण कालीं वा वैदिक कालीं पुष्पांनीं पूजा करण्याचा प्रघात नव्हता असें म्हणत असतात, त्यांनीं या वचनाचें मनन करावें. वेद मंत्रामध्यें पुष्पांनीं केलेल्या पूजेचा उल्लेख नाहीं हें खरें, पण अश्विनी देवता 'पुष्कर स्रजौ' फुलांच्या माला धारण करतात. त्यावरून फुलांच्या माळा घालण्याची पद्धति वैदिक समयीं होती हें सिद्ध होत आहे पण रामायणामध्यें पुष्पांनीं केलेल्या पूजेचा हा येथें उल्लेख अगदीं स्पष्टच आहे.

अग्निसाक्षिक प्रतिज्ञा कोणी मोडीत नसत एवढें अग्नि साक्षिक प्रतिज्ञेचें महत्व त्यावेळीं मानीत असत. याप्रमाणें राम व सुग्रीव यांचें सख्य येथें अग्नीच्या सांनिध्यानें झालेलें आहे व तें अगदीं शेवटपर्यंत टिकलेलें आहे.

त्वं वयस्योऽसि हृद्यो मे एकं दुःखं सुखं च नौ।
सुग्रीवो राघवं वाक्यमित्युवाच प्रहृष्टवत् ॥ १८ ॥ कि० स० ५

'तूं व मी आतां मित्र झालों आहों व उभयताचें सुख व दुःख एक आहे' असें आनंदानें रामाला सुग्रीव म्हणाला. हें सख्य झाल्यामुळें सीता, वाली व रावण यांचे वामनेत्र स्फुरण पावूं लागले.

सीता-कपीन्द्र-क्षणदाचराणां राजीव-हेम-ज्वलनोपमानि।
सुग्रीव-राम-प्रणय प्रसंगे वामानि नेत्राणि समं स्फुरन्ति ॥
कि० स० ५।३२

'सीता, वाली व राक्षस यांचें राम सुग्रीवाचें सख्य झालें तेव्हां वामनेत्र स्फुरण पावूं लागले' सीतेचा नेत्र कमलासारखा होता, वालीचा सुवर्णासारखा पिंवळा होता व राक्षसाचे नेत्र अग्निप्रमाणें लाल होते' पुरुषांचा वामनेत्र स्फुरण पावणें अशुभ, पण स्त्रीचा वामनेत्र स्फुरण पावणें शुभ असतें. यामुळें सीतेला हें शुभ चिन्ह झालें व वाली व राक्षस यांना राम-सुग्रीव मैत्री ही अशुभ सूचक वाटली असल्यास नवल नाहीं.

या प्रमाणें नेत्र स्फुरण रामायण कालींही शुभ व अशुभ समजलें जात असे असें दिसतें.

याचेळीं सुग्रीव म्हणतो—

भार्या वियोगजं दुःखं न चिरात्वं विमोक्ष्यसे।
अहं तामानयिष्यामि नष्टां वेदश्रुतीमिव ॥ ५ ॥ कि० स०

'हे रामा! भार्या वियोग मुळें झालेलें दुःख तुला आतां यापुढें फार वेळ भोगावें लागणार नाहीं. कारण मधुकैटभ राक्षसानीं चोरून नेलेली श्रुति जशी विष्णुनें परत आणली त्याप्रमाणें राक्षसानें नेलेली सीता मी लवकर परत आणीन.' या ठिकाणीं राक्षसानी देवांकडे असलेले श्रुति ग्रंथ चोरून नेले होते. ते विष्णुनें परत आणले, हें प्राचीन वृत्त उपमेसाठीं दिलें आहे. देवाजवळ वेद ग्रंथ होते. ते देव या वेदाच्या आज्ञेप्रमाणें आपलीं कर्तव्यें करीत व उन्नति प्राप्त करीत असत. राक्षसांना हें समजलें. तेव्हां त्यानीं ते वेद चोरून नेले.

तेव्हां देवाचें सामर्थ्य कमी झालें. हें पाहून विष्णुनें राक्षसांचा पराभव करून वेद परत आणले व वेदांच्या सहाय्यानें आपलें बल वाढवलें अशी ही कथा आहे. या कथेवरून वेदांच्या आज्ञेप्रमाणें मनुष्य चालले तर मानवाचें बल व सामर्थ्य वाढणें शक्य आहे असें दिसून येतें. सुग्रीव ही उपमा देत आहे तेव्हां सुग्रीवाला ही श्रुतीचें महत्त्व माहीत होतें असें वाटतें.

## सीतेची खूण

सुग्रीव आणखीही सांगत आहे कीं, त्यानें एक राक्षस स्त्रीला पकडून नेत होता. ती " रामा, रामा, लक्ष्मणा " असा आक्रोश करीत होती व तिनें आम्हाला पाहून आपल्या उत्तरीयामध्यें गुंडाळून कांहीं आभूषणें आमच्याजवळ टाकलीं. तीं मी ठेवलीं आहेत. तीच स्त्री बहुतेक सीता असावी असें मला पक्केपणानें वाटतें. सुग्रीवानें तीं आणवलीं व रामलक्ष्मणापुढें ठेवलीं. रामानें तीं तात्काळ ओळखलीं, उत्तरीय वस्त्रही रामानें ओळखलें. पण लक्ष्मण म्हणाला–

नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुंडले ।
नूपुरे त्वभिजानामि नित्यं पादाभिवंदनात् ॥ २२ ॥ कि. स. ६

' मला बाहुभूषणेंही माहीत नाहींत व कानांतील कुंडलेंही माहीत नाहीं. पण मी नित्य तिचे चरण वंदीत असल्यामुळें या नूपुरांची मात्र मला ओळख पटते. हीं सीतेचींच आहेत. '

या म्हणण्यावरून लक्ष्मण किती व्रतनिष्ठ होता हें समजून येत आहे. सीतेचें तोंड त्यानें कधीच पाहिलें नव्हतें असा याचा अर्थ नव्हे. त्यानें तिच्या चेहऱ्याकडे निरखून टक लावून कधींहि पाहिलें नव्हतें हा याचा अर्थ आहे. म्हणून पायातली भूषणें त्याला ओळखता आलीं, तशी ती वरची येईनात ही तरुण पुरुषांनीं आचरणात आणण्यासारखी मर्यादा आहे.

राम जेव्हां हीं भूषणें पाहून शोक करूं लागला तेव्हा सुग्रीव त्याला म्हणतो–

मर्यादां सत्त्वयुक्तानां धृतिं नोत्स्रष्टुमर्हसि ॥ ८ ॥
व्यसने वार्थकृच्छ्रे वा भये वा जीवितान्तगे ॥
विमृशंश्च स्वया बुद्ध्या धृतिमान्नावसीदति ॥ ९ ॥
बालिशस्तु नरो नित्यं वैक्लव्यं योऽनुवर्तते ।
स मज्जत्यवशः शोके भाराक्रान्तेव नौर्जले ॥ १० ॥ कि.स. ८

' सत्त्वगुणी लोकांची धर्ममर्यादा सोडून देणें तुला योग्य नाहीं. इष्ट वियोग होवो, संकटें येवोत, धनाचा नाश होवो, अथवा जीविताचा नाश होण्याचा प्रसंग येवो. स्वतःच्या बुद्धीनें विचार करणारा मनुष्य खचून जात नाहीं. पण जो मनुष्य नेहमीं शोक करीत राहतो तो ओझ्यानें अधिक भार झालेली नौका जशी बुडते तसा तो शोकसागरात बुडून जातो. ' असें सुग्रीवानें सांगितलें असतां रामानें अश्रूंनीं भिजून गेलेलें आपलें तोंड वस्त्रानें पुसलें व धैर्य धरल्याप्रमाणें तो पुनः ओजस्वी दिसूं लागला. ज्याची पत्नी गुण्डांनीं पळवली असेल त्याला कसें दुःख होऊं शकतें, तें या रामाच्या अवस्थेवरून समजण्यासारखें आहे.

याठिकाणीं वाल्मीकि ' नर-वानरौ ' ( कि० स० ७।२४ ) असा शब्द प्रयोग करून नर राम व वानर सुग्रीव याची मैत्री. येथें झाली असें दाखवीत आहे. कित्येक ठिकाणीं ' शाखामृग ' ( कि० स० ९।१७ ( अर्थी म्हटलेलें आहे यावरून सुग्रीव, हनुमान हे वानर होते असें कोणी म्हणेल, पण ' वेद जाणणारा, संस्कृतमध्यें अस्खलित बोलणारा ' हीं वर्णनें पाहिलीं, म्हणजे ही एक मनुष्याची जातीच होती असें उघड होतें. ' वानर, शाखामृग ' असे शब्द जरी आले तरी भिक्षुरूप घेणें, पुनः वानररूप घेणें हें वेषान्तर माकडाकडून होणें शक्य नाहीं- यासाठीं असा शब्द प्रयोगावरून पुनःपुनः भ्रम होण्याचें कांहीं कारण नाहीं.

सीतेचें अपहरण परराष्ट्रांतील राक्षसानें केलेलें होतें व सुग्रीवाच्या रुमेचें अपहरण त्याचा भाऊ प्रत्यक्ष वाली यानेंच केलें होतें. हा अपहरणांत झाला तरी हा असा फरक आहे. शिवाय सुग्रीव राज्यावर आला तेव्हां त्यानें वालीच्या स्त्रीला-तारेला-आपल्याजवळ केलेंच होतें. तारा ही जी पांच सती स्त्रियांमध्यें गणली गेली आहे ती वालीकडे व नंतर सुग्रीवाकडे राहत होती असें दिसतें. पण सीतेबद्दल तसें म्हणतां येणार नाहीं. म्हणून सुग्रीवाच्या पत्नी अपहरणाच्या दुःखापेक्षा रामाचें दुःख फारच असह्य होतें. शिवाय पंच कन्यांमधील तारा ती हीच की काय हीही एक शंका येथें येण्यासारखी आहे.

वालीचें बल फार प्रचंड होतें राम कसाही शूर असला तरी तो वालीच्या समोर उभा राहूं शकेल या संबंधाची खात्री सुग्रीवाला वाटत नव्हती असें त्यानें ( कि० स० ११·७९ व ११।९० ) या ठिकाणीं बोलून दाखवलें आहे. त्यानंतर जेव्हां रामानें आपल्या बाणानें सप्ततालवृक्ष भेदून टाकले, तेव्हां हा वालीला मारील अशी सुग्रीवाची खात्री झाली व त्यानंतरच त्याला खरा आनंद झालेला आहे यानंतर सुग्रीव व राम यांचा बेत ठरला व त्याप्रमाणें रामलक्ष्मण झाडाच्या आड लपून बसले व सुग्रीवानें वालीला आव्हान दिलें वाली आला व वालि सुग्रीवाचें मुष्टियुद्ध झालें हें युद्ध चाललें असतांना रामाला अमूक वाली व अमूक सुग्रीव असें ओळखतां येईना कारण दुरून दोघेही सारखे दिसत होते चुकून सुग्रीवालाच जर बाण लागला, तर मित्रवध होईल या भीतिनें यावेळीं रामानें बाण सोडला नाहीं पण यामुळें सुग्रीवाला मात्र मरणांप्रमाणें वेदना सहन कराव्या लागल्या. वालीचे मुष्टिप्रहार सहन करणें हें कांहीं सोपें नव्हतें रामानें आपणास फसवलें असेंच या वेळीं सुग्रीवास वाटलें. पण जेव्हां रामानें सांगितलें कीं तूं कांहीं खूण आपल्या अंगावर ठेव म्हणजे त्या खुणेनें मी अमूक सुग्रीव आहे असें ओळखीन व मी वालीवरच बाण मारीन हें सुग्रीवाला पटलें व त्यानें पुन वालीला आव्हान दिलें

रामलक्ष्मण झाडाच्या आड लपून राहिले व सुग्रीव युद्धाच्या जागेवर तयारीनें उभा राहिला सुग्रीवाचें आव्हान वालीपर्यंत पोंचलें व वाली ती सुग्रीवाची गर्जना ऐकून फारच रागावला व गुरगुरत सुग्रीवाकडे यावयास निघाला त्यावेळीं तारा पुढें आली व वालीला आलिंगन देऊन त्याला म्हणाली—

> सहसा तव निष्क्रामो मम तावन्न रोचते ।
> श्रूयतां अभिधास्यामि यन्निमित्तं निवार्यसे ॥ ९ ॥

' हे वाली ! तुझें एकदम युद्धासाठीं जाणें मला बरें वाटत नाहीं. मी कां तुला प्रतिबंध करीत आहें तें तू ऐक तारा म्हणते— 'ज्या अर्थी एकदा पराभव घेतल्यानंतर पुन सुग्रीव युद्धाची आरोळी मारीत आहे. त्या अर्थी त्याला कोणी तरी सहायकर्ता लाभला आहे हें निश्चित होय प्रबल सहायक नसताना तो पुन

येईल हें शक्य नाहीं. हे वाली ! मला अंगदानें नुकतेंच असें सांगितलें कीं, सुग्रीव व धनुर्धर राम यांचें सख्य झालेलें आहे व तो राम मोठा पराक्रमी आहे. यासाठीं सुग्रीव त्या रामाच्या सहाय्यानें येथें पुनः आला असावा. यासाठीं तूं-

यौवराज्येन सुग्रीवं तूर्णं साध्वाभिषेचय ॥ २३ ॥
विग्रहं मा कृथा वीर भ्रात्रा राजन् यवीयसा ॥
अहं हि ते क्षमं मन्ये तेन रामेण सौहृदम् ॥ २४ ॥
सुग्रीवेण च संप्रीतिं वैरमुत्सृज्य दूरतः ॥ कि० स० १५

' हे वाली हे राजा ! तूं सुग्रीवाला यौवराज्याचा अभिषेक कर. सुग्रीवाशीं असलेलें वैर दूर टेव. त्याच्याशीं स्नेह कर व रामाशीं ' मैत्री कर ' हें तारेचें म्हणणें योग्य होतें. पण तें घडणें शक्य नव्हतें. यांचें कारण एक तर वाली आपल्या अजस्र सामर्थ्यामुळें गर्विष्ठ झालेला होता व तो स्त्रियांची बुद्धि ऐकावयास तयार नव्हता ! व दुसरी गोष्ट ही कीं त्यांचें व रावणाचें अग्नि साक्षीक सख्य झालेलें होतें. तेव्हां रामाची सीता पळवून नेणाराचा तो मित्र होता त्यामुळें त्याचें व रामाचें सख्य होणें शक्य नव्हतें. या दोन कारणानीं तारेचा उपदेश वालीला पसंत पडणें शक्य नव्हतें, याप्रमाणें घडलें.

तामेवं ब्रुवतीं तारां ताराधिपनिभाननाम् ।
वाली निर्भर्त्सयामास वचनं चेदमब्रवीत् ॥ १ ॥
सोढुं न च समर्थोऽहं युद्धकामस्य संयुगे ।
सुग्रीवस्य च संरम्भं हीनग्रीवस्य गर्जितम् ॥ ४ ॥
न च कार्यो विषादस्ते राघवं प्रति मत्कृते ।
धर्मज्ञश्च कृतज्ञश्च कथं पापं करिष्यति ॥ ५ ॥ कि० स० १६

' राम धर्म जाणणारा आहे ' हें वालीनें ऐकलें होतें पण राम कांहीं राजकारणांत पडलेला आहे हें यावेळीं वालीच्या लक्षांत आलें नाहीं. त्यामुळें तो म्हणतो राजकारण तें राजकारण व धर्मकारण तें धर्मकारण होय आपण जो निष्कारण वालीशीं विरोध केला न त्यामुळें तो चिडून गेला आहे व त्यानें रामाशीं मैत्री करून आपल्या वधाचा विचार निश्चित केला आहे व रामही आडून आपल्यावर बाण मारण्यास तयार झाला आहे याचा त्याला काहीएक थांग लागला नव्हता. निष्कारण आपल्या भावाशीं वैर करणें चांगलें नव्हे हा बोध येथें आपणास मिळत आहे सुग्रीवाचा दोष नसताना सुग्रीवाचें म्हणणें ऐकून न घेतां त्याला घरातून घालवून दिलें हें वालीचें कृत्य अयोग्य झालें याचा परिणाम सुग्रीव व रामाचें सख्य व पुढें वालिचा वध होण्यांत झाला असो यापुढें सुग्रीव व वालीचें युद्ध चालूं असतांना रामानें आडून बाण मारला व त्या बाणानें वालीचा वध झाला

वाली घायाळ होऊन मरणाच्या पंथाला लागला असतां राम व लक्ष्मण त्याच्याजवळ गेले, तेव्हां तो रामाला म्हणाला—

> पराङ्मुखवध कृत्वा कोऽत्र प्राप्तस्त्वया गुण ॥ २० ॥
> न मामन्येन संरब्धं प्रमत्तं वेद्धुमर्हसि ।
> इति मे बुद्धिरुत्पन्ना बभूवादर्शने तव ॥ २१ ॥
> स त्वां विनिहतात्मानं धर्मध्वजमधार्मिकम् ।
> जाने पापसमाचारं तृणैः कूपमिवावृतम् ॥ २२ ॥ कि० स० १७

' मी दुसऱ्याशीं युद्ध करण्यांत गुंतलों असतां गुप्तपणानें माझा वध करून तुला काय बरें मिळालें ? तू असा अधर्म करणार नाहींस असें मला तुला पाहण्यापूर्वी वाटलें होतें तू धर्माचा झेंडा मिरवतोस, पण तू पक्का अधार्मिक आहेस पाप करणारा आहेस एखादा कूप जसा गवतानें आच्छादिलेला असावा, तसा तू फार भयंकर पातकी आहेस ' असें वाली रामाला पुष्कळ कठोर शब्दांनीं बोलला ' पृथ्वीवर तुझें धार्मिक म्हणून जें वर्णन केलें जात आहे, तें सर्व खोटें आहे पण तुझ्या प्रत्यक्ष दर्शनानें मला कळून आलें आहे कीं तू पूर्णपणें कपटी व क्रूर आहेस असें वाली बोलला ' शेवटीं तो म्हणाला—

कामभेवंविधो लोकः कालेन विनियुज्यते।
क्षेमं चेद्भवतो प्राप्त उत्तर साधु चिन्त्यताम् ॥५३॥ कि स. १७

' तुला योग्य वेळीं राज्य प्राप्त झाल्यावर प्रजाजनांनीं माझा वध करण्या-संबंधीं जर तुला प्रश्न विचारला तर त्याचें उत्तर काय यावयाचें तें नीटपणानें एकाग्रतापूर्वक विचार करून ठेव ' असें कठोर पण सौम्य शब्दांनीं वालीनें भाषण केलें तें मर्मभेदक तर होतेंच पण प्रजाजनांना राजाच्या कृत्यासंबंधानें प्रश्न विचारण्याचा अधिकार होता व राजाला आपल्या कृत्याचा जाब द्यावा लागे, असें या भाषणावरून दिसतें वानर राज्यात जर असा अधिकार असला, तर तसा आर्यराज्यात असेलच यात शंका नाहीं या वालीच्या बोलण्याला रामानें कसें उत्तर दिलें आहे तें पहा–

' हे वाला! धर्म, अर्थ, काम व लौकिक व्यवहार यांचा विचार केल्याशिवाय तूं हें उगीच काहीं तरी बोलत आहेस मनूनें हें सर्व भूमिचें राज्य इक्ष्वाकु-वंशातील राजाना दिलें आहे ' तेव्हांपासून तें या वंशाकडेच चाललेलें आहे. या राज्यातील नगरें व अरण्यें यात राहणाऱ्या सर्वांचा निग्रह करावा अथवा त्याच्यावर अनुग्रह करावा हा अधिकार इक्ष्वाकुवंशाचा आहे. या वेळीं या राज्याचा शासन करणारा भरत या पृथ्वीचें पालन करीत आहे. न्याय, नियम, सत्य व पराक्रम या राजा भरतामध्यें पूर्णपणें वसत आहेत–

तस्य धर्म कृतादेशा वयं अन्ये च पार्थिवाः।
चरामो वसुधां कृत्स्नां धर्मसन्तानमिच्छवः ॥ ९ ॥
यस्मिन्नृपतिशार्दूले भरते धर्मवत्सले।
पालयत्यखिलां पृथ्वीं कश्चरेद्धर्मविप्रियम् ॥ १० ॥
ते वय मार्गविभ्रष्टं स्वधर्मे परमे स्थिताः।
भरताज्ञां पुरस्कृत्य चिन्तयामो यथाविधि ॥ ११ ॥
त्वं तु संक्लिष्ट धर्मश्च कर्मणा च विगर्हितः।
कामतन्त्रप्रधानश्च न स्थितो राजवर्त्मनि. ॥ १२ ॥
तदेतत्कारण पश्य यदर्थं त्व मया हतः।
भ्रातुर्वर्तसि भार्यायां त्यक्त्वा धर्मं सनातनम् ॥ १८ ॥

अस्य त्वं धरमाणस्य सुग्रीवस्य महात्मनः ।
रुमायां वर्तसे कामात्स्नुषायां पापकर्मकृत् ॥ १९ ॥
तद्व्यतीतस्य ते धर्मात् कामवृत्तस्य वानर ।
भ्रातृभार्याभिमर्शेऽस्मिन् दण्डोऽयं प्रतिपादितः ॥ २० ॥
न च ते मर्षये पापं क्षत्रियोऽहं कुलोद्भवः ।
औरसीं भगिनीं वापि भार्यां वाप्यनुजस्य यः ॥ २१ ॥
प्रचरेत नरः कामात्तस्य दण्डो वधः स्मृत ॥ कि० स० १८

'या भरत राजाच्या आज्ञेनें आम्ही व आणखीहि दुसरे राजे या पृथ्वीवर धर्माचें संरक्षण करण्यासाठीं संचार करीत आहों. अरे धर्मवत्सल नृपश्रेष्ठ भरत या पृथ्वीचें पालन करीत असतां, कोण बरें धर्मनाश करण्यास तयार होईल ? राजा भरताच्या आज्ञेनें आम्ही सर्व ' धर्म सोडून आचरण करणाराला योग्य तो दण्ड करण्यासाठींच फिरत आहों. ' तूं तर निंदित कर्म करणारा-कामाच्याच मार्गी लागलेला धर्म नाश करीत आहेस व उघड राजधर्माला सोडून चालत आहेस. तुला वध करण्याचें हें असें कारण आहे. तूं सनातन धर्मा, चा त्याग केलास व आपल्या भावाच्याच बायकोशीं काम संबंध करीत आहेस. आपल्या धाकट्या भावाची बायको ही तुझी सूनच आहे. सुनेशीं संबंध ठेवणें हें पाप आहे. तें पाप तूं येथें करीत आहेस. आपला धर्म सोडलास, कामातुर होऊन भावाच्याच बायकोशीं संबंध ठेवीत आहेस. म्हणून आम्ही तुला हा दंड केलेला आहे. मी कुलीन क्षत्रिय असल्यामुळें तुझ्या पापाकडे दुर्लक्ष्य करणें मला शक्य नाहीं. कन्येशीं बहिणीशी अथवा भावाच्या बायकोशीं जो असा वाईट संबंध ठेवील त्याला वधदण्ड देणेंच योग्य आहे. ' असें रामानें ठणठाऊन वालीला सांगितलें. गुप्त ठिकाणीं रहून राहून बाण सोडला याबद्दल राम असें म्हणतो–

न मे तत्र मनस्तापो न मन्युर्हरिपुङ्गव ।
वागुराभिश्च पाशैश्च कूटैश्च विविधैर्नराः ॥ ३८ ॥
विध्यन्ति विमुखांश्चापि न च दोषोऽत्र विद्यते ॥ ४० ॥
कि० स० १८

' तुझा आडून वध केल्यामुळे माझ्या मनाला मुळींच पश्चात्ताप झालेला नाहीं कारण जाळीं व कपटयुक्त उपायांनीं मृगाना मारतातच.' तूंही एक प्रकारचा मृगच आहेस. तेव्हा अशा तुझा दडून वध केला तर त्यात काहीही अपकृत्य झालेलें नाहीं तू दुसऱ्याशीं युद्ध करीत होतास हें खरें आहे. पण तूं बोलून चालून वानर आहेस. तेव्हां तुझा असा वध केला यात काहींही अयोग्य असें माझ्याकडून झालेलें नाहीं.' यासाठीं मी जें केलें तें अगदीं योग्य केले आहे.

या ठिकाणीं वानर जातीबद्दल थोडासा तिरस्कार रामाच्या बोलण्यात दिसत आहेसें वाटतें अमेरिकन गोरा माणूस काळ्या निग्रोला जिवंत जाळतात, भाले खुपसून मारतात व इकडे समतेचाही टेंभा मिरवितात. ही त्याची मानवता गोऱ्या लोकांपुरतीच असते. काळ्या, पिवळ्या व तपकिरी लोकासंबंधानें समता त्याच्या अन्तःकरणात नसते. वानर विद्वान शिक्षित होते, त्यांच्यात वैवाहिक बंधनें होतीं. काही करारमदार ते पाळीत ते जरी आर्यांइतके उच्च पातळीवर पोंचलेले नसले तरी ते पशु नव्हते तूं वानर असल्यामुळें वानरांना जाळ्यात पकडतात, तेव्हा आडून बाण मारून ठार केलें तर त्यात काय बिघडलें ? असें म्हणून वानर जातीबद्दल जो तिरस्कार व्यक्त केला आहे तो जातीय दृष्टीनें योग्य नव्हे. रामाला वानराचें सहाय्य पाहिजे होतें. त्याच्या सहाय्यावाचून सीतेचा शोध लागणें शक्य नव्हते. नुकतीच सुग्रीवाशीं भेट झालेली आहे. त्यास फारसे दिवसही झालेले नसतील. इतक्यात सुग्रीव व हनुमान यांच्या समक्ष ' तूं तर शाखामृग आहेस तुझ्यावर आडून बाण मारला व तूं दुसऱ्याशीं युद्ध करण्यात गुंतला असताना तुला ठार मारला, तर त्यात काही अयोग्य झालें असें होत नाहीं.' असें म्हणणें योग्य दिसत नाहीं

## स्वकीयांशीं विरोध व परकीयांशीं स्नेह

पण हें बोलणें आपल्या भाऊ बंधकीच्या वैरामुळें सुग्रीवाच्या नीटपणानें ध्यानीं आलेलें दिसत नाहीं. आपल्या जातीविषयींची तुच्छता यात व्यक्त होत आहे हें सुग्रीवाच्या लक्ष्यातही आलेलें दिसत नाहीं.

युरोपीय लोक जेव्हां येथें आले व ते राजकीय दृष्टीनें जेव्हां वर डोकें काढूं लागत होते त्यावेळीं हिंदु व मुसलमान लोक त्यांच्याकडे नोकरीस राहत, त्यांच्या सैन्यांत भरती होत व आपल्या देशबांधवांचा गळा कापीत व शेवटीं अशा रीतीनें यांनीं सर्व भारतवर्ष युरोपियनांच्या हवालीं केला. त्या वेळीं जी भारतीयांची मनोवृत्ति दिसली, स्वदेशीयांशीं विरोध व परकीयांशीं वात्सल्य तीच वृत्ति येथें सुग्रीवाच्या वागण्यांत दिसत आहे.

आपल्या भावाचा वध होवो आपल्या जातीला क्षुद्र मानलें जावो, अयोग्य रीतीनें आपल्या भावाला मारलेलें असो, मला राज्य मिळालें म्हणजे झालें हा विचार सुग्रीवाच्या मनांत असलेला येथें स्पष्ट दिसत आहे.

बरें, इकडे वालीच्या वागणुकीकडे जरी पाहिलें तरी आपल्या भावाशीं मित्रता करावयाची तयारी नाहीं. शिवाय पत्नीनें सांगितलें व सुचविलें असतांही हा वाली सुग्रीवाला यौवराज्यावर बसवीत नाहीं किंवा त्याच्याशीं प्रेमानें वागण्यास तयार होत नाहीं. भावाशीं वैर व परदारग स्वभावाच्या रावणाशीं कायमची मैत्री !!! ही हिंदुस्थानांतील लोकांची वृत्ति व वानर जातींत येथें स्पष्ट दिसत आहे.

युरोपीयन लोक येथें आले ते येथील राजाकडे नोकरीस राहतांना युरोपीयनांशीं युद्ध जुंपलें असतां आपण लढणार नाहीं, असें म्हणत असत व युरोपीयनांशीं युद्ध टाळीत असत. पण हिंदी लोक मात्र युरोपियनांच्या सैन्यांत भरती होतांना आपण भारतीयांना लढणार नाहीं असें म्हणत नसत. ‘ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी’ हा भारतीयांचा विचार होता. पण युरोपियन युरोपांत भांडत असत तरी ते येथें एकमेकांशीं इतक्या मूर्खतेनें भांडत नव्हते. जरी त्यांच्यांत स्पर्धा होती तथापि त्या स्पर्धेमुळें त्यांचाच संहार होत नसे. पण भारतीयांच्या स्पर्धेनें भारतीयच मारले जात. हा जातीय भावनेनें न जगण्याच्या सवयीचा परिणाम आहे. भारतीयांमध्यें आपण व्यक्तिनें जगावें एवढाच भाव जागृत होता, राष्ट्र जगावें, जाति जगावी हा भाव नव्हता. तीच स्थिति या वेळीं वानरांची दिसत आहे. परकीयांच्या सहाय्यानें स्वकीयांचा नाश होत असला तरी चालेल ! वानरजाति दूर होवो, घातकी होवो, बरबाद होवो,

युद्ध करेलेतही प्रवीण होती. पण भावाशीं वैर व इतरांशीं मैत्री करण्यांत आपण काही वाईट केलें असें यांस वाटत नव्हतें. ही यांची राजकीय व जातीय उंची होती. वाली व सुग्रीव यांची हो एकच विचाराची पातळी होती.

राम हा आदर्श पुरुष होता. यामध्यें श्रेष्ठपणाच्या दृष्टीनें कोणतेंही व्यंग नव्हतें. पण आर्यांच्या मनात वानरांविषयीं वाटत असलेला तुच्छतेचा भाव येथें सहजच त्याच्या तोंडातून बाहेर पडला आहे. राम, हनुमान व सुग्रीव यांच्या मैत्रीचें महत्त्व जाणत नव्हता असें नाहीं, पण जाणत असताही व सुग्रीवाचा गौरव करण्याची इच्छा मनात असूनही वानर जाती विषयींची तुच्छतेची भावना सहजच त्याच्या तोंडातून बाहेर पडलेली आहे.

## राजकीय सत्य

आता रामानें जें वालीस सांगितलें कीं ' भरत राजा आहे त्यानें मला दुष्टांना दण्ड देण्यास वनामध्यें पाठवलें आहे व तसेंच त्यानें इतर पुष्कळ राजांस किंवा अधिकाऱ्यास पाठवलें आहे. त्यामुळें मला तुला वध दंड देण्याचा अधिकार आहे. तूं आपल्या भावाची बायको आपल्याजवळ केली आहेस. आणखीही पुष्कळ अपकृत्यें केलीं आहेस. यासाठीं मी भरत राजाचा प्रतिनिधि म्हणून तुला हा वध दण्ड करीत आहें हें सर्व राजकीय सत्य आहे वास्तविक स्थिति अशी आहे कीं, राम कैकेयीच्या महत्त्वाकांक्षेमुळें वनवासी झाला होता. हद्दपार झाला होता भरताच्या मनात दशरथाच्या मृत्युनंतर रामानें अयोध्येंत यावें व राज्य करावें असें होतें. पण तें रामानें मानलें नाहीं दशरथाची प्रत्यक्ष आज्ञा रामानें वनवासाला जावें अशी नव्हती रामानें वनवासाला जावें अशी फारतर नाइलाजानें मूकसंमति दशरथाची होती असें म्हणता येईल. दशरथानंतर भरत राज्यसिंहासनावर बसलेला नाहीं. रामाचें राज्य व त्याचा प्रतिनिधि म्हणून भरतानें राज्य चालविलें होतें. म्हणून वनातील टोळ्याचें नियमन करण्याचें कार्य न दशरथानें रामावर सोंपविलें होतें व न भरतानें सोपविलें होते. भरत तशी आज्ञा रामाला करण्याच्या मनः स्थिति–मध्येंही नव्हताच. कैकयीची इच्छा तर अशीच होती कीं रामलक्ष्मण सीता यांनीं वनात जावें व १४ वर्षें भरतानें राज्यावर येऊन दृढमूल व्हावें. राम

वनामध्यें नाश पावला तर त्यामुळें कैकेयीला आनंदच झाला असता. अशा स्थितीत ‘ मी भरत राजाचा प्रतिनिधी आहें व मी वन्य जातींच्या दुराचाराचा दंड देण्यासाठीं येथें हिंडत आहें.’ हें म्हणणें राजकीय दृष्ट्याच शोभण्यासारखें आहे. राजकीय दृष्टीनें अशावेळीं कसें बोलावें व काय करावें तें यावरून समजून घ्यावें. भारतीयांना यापुढें राजकीय जीवनानें निर्वेध रहावयाचें आहे यासाठीं अशीच राजकीय सत्यें यापुढें त्यांनीं पाळावयास हवें. तेंव्हा वालीस दडून मारलें कीं नाहीं असें बाजू करून चालणार नाहीं.’

वालीमारण्याला लपून छपून कपटानें कसें का होईना, मारावें व आपण मारलें यासाठीं मुळींच पश्चात्ताप करूं नये व उलट मी केलें तें अगदी योग्य [illegible] केलें, असेंही येनकेन रीत्या म्हणावें, हीच राजनीति आहे. आर्य चाणक्य आपल्या राजनीति शास्त्रांत असेंच म्हणत आहे आज पुष्कळ [illegible] हिंदू [illegible] असे आहेत कीं, त्यास रामानें लपून छपून वालीस मारलें हें [illegible] नाहीं. आमच्याकडे अशीं अनेक पत्रें आलेलीं आहेत व त्यांत हाच प्रश्न विचारला आहे कीं, रामानें वालीला लपून छपून मारलें हें बरें केलें की वाईट केलें? हिंदू लोकांना राजनीतिचे पाठ शिकावयाचे आहेत त्यांना असें वाटतें कीं [illegible] चीं कामें अगदी सोंवळेपणानें होत असतात.

येथें विचार असा केला पाहिजे कीं, वाली अधिक प्रबळ, अधिक [illegible] व घमेंडखोर राजा होता त्याचा [illegible] अर्धवट सुधरलेली व अर्धवट रानटी अशा [illegible] कडवेपणामुळें इतरांवर [illegible] होती राजाशी [illegible] करण्यास ती तयार असे वाली [illegible] रावणाचाही पराभव केला होता. रावणाचा [illegible] रावणाचा पराभव करून त्याच्याशीं [illegible] एखादें दुसऱ्यावर आक्रमण [illegible] आक्रमण केलें तर दुसऱ्यानें त्याच्या मदतीला गेलें पाहिजे, असा हा [illegible] रावण यांचा करार झालेला होता.

*

एकदा वालीसुद्धा सरळपणानें पराभूत होणें कठिण व त्यांत जर त्याच्या बरोबर रावण आला तर या दोघांना पराभूत करणें किती कठिण काम आहे, याची कल्पना सहज होण्यासारखी आहे वाली मुळचा हेकेखोर व घमेंडी रामानें जर वालीची मदत मागितली असती, तर ती त्यानें रामाला द्यावी असें वालीचें काय अडलें होतें ? वालीनें रामाला मदत नाकारावी व उलट रावणाला कळवावें व त्याच्याकडून हवीतर मदत आणावी अशा परिस्थितींत म्हणजे अत्यंत दुःस्थितींत व स्त्री होता राम बोलून चालून राज्यभ्रष्ट, वनवासी, असहाय्य, पत्नीचें अपहरण झालें, कोणाचीही मदत नाहीं अशा स्थितींत होता वाली याच्या उलट स्वतः बलिष्ठ, हेकेखोर, घमेंडी, प्रबल सेनाजवळ असलेला, सर्व राष्ट्र पाठी मागें आहे, इष्ट झाल्यास रावणाचें सहाय्य मिळण्याची शक्यता अशा अनुकूल परिस्थितींत वालीसारखा प्रबळ राजा रामासारख्या सर्वतोपरि विपत्तींत असणाऱ्या त्याला कां म्हणून मदत करील ? व रामासारख्या विपत्तींत बुडणाऱ्याचें सहाय्य करावें व रावणाची मैत्री गमवून बसावें ! असें कोण बरें करील ?

"सुग्रीवाची स्थिति अगदीं विपरीत होती राम व सुग्रीव या दोघांचीही सारखीच विपत्तीची परिस्थिति होती दोघेही राज्यभ्रष्ट, दोघेही असहाय्य, दोघेही पत्नीचें अपहरण झालेले अशा समान शीलत्वामुळें या दोघांची मित्रता होणें हें सहज होणारें काम होतें. सुग्रीवाला राज्य मिळवून दिलें कीं त्याचें राज्य, त्याचा खजिना, त्याचें सर्व सैन्य हें रामाला मिळण्यासारखें होतें वालीची मित्रता होणेंच मुळीच अशक्य होतें सुग्रीवाची मित्रता होणें हें सहज होणें शक्य होतें या साठीं वालीला ठार मारून वानर राज्य सुग्रीवाला देणें रामाला भाग होतें रावणाचें राज्य उलथून पाडावयाचें असलें, तर त्याचा मित्र जो वाली त्याचा वध करून रावणाचें अर्धें मित्रबल खच्ची करणें आवश्यकच होतें हेंच रामानें केलें, तें अगदीं योग्य केलें आहे याहून दुसरा कोणताही मार्ग त्याला करता येण्या जोगा नव्हता

## वालीचा वध निर्दोष आहे.

आता लपून वालीला मारावें कीं न मारावें हा प्रश्न राहतो त्या संबंधाचा विचार असा आहे भगवान श्रीकृष्णाच्या समोर, किंबहुना त्याच्या अनुमतीनें

पितामह भीष्म, द्रोण, कर्ण आदि शत्रु पक्षीय वीरांचा निःपात कपटानेंच झालेला आहे. शत्रु प्रबल आहे सरळ उपायानें मरत नसेल, तर ज्या उपायानें त्यास ठार करता येईल, त्या उपायानें त्यास ठार केलाच पाहिजे हेंच राजकीय सत्य आहे अशा प्रसंगीं मागें पाय घेता उपयोगी नाही हेंच अशा रीतिनें रामानें वालीचा वध करून आर्यांना उदाहरण घालून दिलें आहे.

दशरथानें केलेल्या अश्वमेध यज्ञामध्यें ऋषिनीं रावण साम्राज्याचा नाश करण्याचा ठराव केला. त्यावेळीं तेथें कांहीं देववीर ही होते. [redacted] रावणी साम्राज्याचा नाश व आर्य राज्याची उभारणी करण्याचा उद्योग त्यावेळपासून चाललेला होता. नाशिकला रावणाची सेना होती व ती आर्य व वानर यांची संघटना होऊं देत नव्हती. राम नाशिकला आल्यानंतर त्या सेनेचा रामानें प्रथम नाश केला व यामुळें रावणाचें बल कमी केलें. त्यानंतर वाली [redacted] रावणाचा फार मोठा सहायक होता. याला जर ठार केला नसता, तर रामाचें पाऊलच दक्षिणेंत पडूं शकलें नसतें. दक्षिण भारत वालीच्या ताब्यांत होता. त्यात आर्यांचा प्रवेश होणेंही कठिण होतें. वालीच्या मृत्युनें रावणाचें अर्धे बळ कमी होणार होतें. राम जर वालीसमोर युद्ध करण्यासाठीं उभा राहता, तर वालीच्या लाखो सैनिकांचा सामना त्याला येथेंच करावा लागला असता एकट्या रामानें येथें वसलेल्या दणकट सैन्याशीं सामना करणें जवळ जवळ अशक्य होतें. बरें रामानें वालीचें सर्व सैन्य ठार केलें व वालीलाही मारलें, असें मानलें, तरी रावणाबरोबर युद्ध करण्यासाठीं मग कोणतें सैन्य रामाला मिळालें असतें ? यासाठीं वानर-सैन्य तर जिवंत ठेविलें पाहिजे व वालीचा काटा दूर केला पाहिजे. तो अशा तऱ्हेनेंच दूर होणें शक्य होतें.

प्रत्यक्ष राज्य करीत असलेल्या वालीबरोबर युद्ध जुंपलें व त्यानें आपलें सैन्य पुढें आणलें तर त्यास नको असें म्हणता येणार कसें व तो कां म्हणून ऐकेल ? या सर्व आपत्ती टाळण्यासाठीं लपून छपून कपटानें वालीला मारणें हा एकच मार्ग रामापुढें होता व तो त्यानें उत्तम रीतिनें अवलंबिला हें अगदीं त्याचें करणें पूर्णपणें निर्दोष आहे. राजकारणाच्या दृष्टीनें दुसरा कोणताही मार्ग रामानें अवलंबिला असता, तर तो अप्रशस्तच ठरला असता.

रामानें अशा रीतीनें वालाचा वध करून रावणाचें अर्धे अधिक बल कमी केलें. रावणाचें कमरडेंच येथें तुटलें व त्याचें साम्राज्य मोडल्यासारखेंच झालें सर्व दक्षिण दिशा सुग्रीवाला राज्य मिळाल्यामुळें आर्यांना जाण्यायेण्यास मोकळी व सुरक्षित झाली, वानरांचें हसलेलें सर्व सैन्य सर्व युद्ध सामग्रीसह रामाच्या सहाय्यासाठीं मिळालें व आपल्या पक्षाची कांही एक हानी झाली नाहीं. रावण दुष्ट होता त्याचें साम्राज्य तोडावयाचेंच होतें, यासाठीं त्याचे आजूबाजूचे हितसंबध जेथें जेथें असतील, ते तोडणें हें अगदीं योग्यच आहे. म्हणूनच वाली वध राजकीय डाव पेंचाच्या दृष्टीनें अगदीं समर्थनीय व अगदीं योग्यच ठरत आहे.

आता वालीवधासाठीं ' त्यानें भावाच्या बायकोशीं संबंध ठेवला ' इत्यादि जीं कारणें रामानें दिलीं आहेत तीं राजकारणात अशाच रीतीनें मांडली पाहिजेत व त्या दृष्टीनें तीं अगदीं योग्य रीतीनें मांडली गेलीं आहेत. वालीवधाच्या समर्थनार्थ रामाचें जें भाषण झालें तें राजकारणाच्या दृष्टीनें उत्तम भाषण आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. पण खरें कोणी पाहिलें तर त्यास सुग्रीवाचाही तोच दोष होता असें दिसेल सुग्रीव राजा झाल्यावर तारा त्याच्याकडेच राहिलेली आहे ज्येष्ठ भ्राता मेल्यावर त्याची बायको धाकट्या भावाकडे यावी, **' देवरः कस्मात् द्वितीयो वर उच्यते** ( निरु० ) या संबधामुळें कदाचित् कोणी याचें समर्थन करील पण तें समर्थन फारसें जोरदार ठरणार नाही. तथापि सुग्रीव जरी त्याच मार्गानें गेला असला, तरी त्याला पुढें बोल लावणार कोण ? वालीच्या वधाच्या वेळीं सुग्रीव निर्दोषच होता असेंही म्हणतां येणार नाहीं. असो. या प्रमाणें राजकीय घडामोडींच्या दृष्टीनें या गोष्टी पाहिल्या पाहिजेत व ही राजनीति शास्त्राची दृष्टी आपल्या आर्य लोकांमध्यें यावी याचसाठीं रामानें हा इतिहास उदाहरण होण्यासाठीं प्रत्यक्ष करून दाखवला आहे तो भारतीयानीं पहावा व आपल्या जीवनात मुरवावा, एवढ्यासाठींच तो आहे. राजकारण राजकीय उलाढालीसाठींच असतें. तें दैनिक नागरिक व्यवहारात उतरता नये, हें काहीं येथे निराळें सांगावयास नको

## रामाच्या जीवनांत एकच प्रसंग

अशा राजनीतिचा आश्रय करून वागण्याचा रामाच्या जीवनात वाली वधाचा

हा एकच प्रसंग आहे. त्यांच्या सर्व आयुष्यात भगवान रामचन्द्र हे एकवचनी, एकपत्नी, एकबाणी असेच वागले आहेत व ते कडक रीतिनें वागले आहेत. वाली वधाचा हा प्रसंगच असा होता कीं जगदुद्धाराचा कार्यक्रम साधणें कीं नसणें हें यावर अवलंबून होतें. रामानें ज्या कार्यासाठीं जन्म घेतला तें महत्कार्य होतें. सज्जनांचें परित्राण दुष्टांचें निर्दालन व धर्माची घडी बसवण्याचें तें कार्य होतें. वाली न मरता तर रावणाचें बल वाढणार होतें. वालीनें रावणालाच मदत करावी असा करार या पूर्वीच झालेला होता. ससैन्य वालीशीं संग्राम करावा एवढी तयारी रामाची नव्हती. अशा प्रसंगीं द्वन्द्व युद्धाचे सर्व नियम पाळावे व जगदुद्धाराचें कार्य बिघडवून टाकावें हें योग्य नव्हतें. यासाठीं अशा कठिण प्रसंगीं वालीवर आडून बाण मारला व रामानें राजनीतिच्या सहाय्यानें मोठा विजय मिळवला आहे. इतकेंच नव्हेतर आता रावणवध झालाच असें रावणाविरुद्ध कट करणाऱ्या ऋषींना व मनामध्यें अनुकूलता धारण करणाऱ्या देवानाही वाटलें इतक्या महत्त्वाचें हें कृत्य होतें.

जन्मामध्यें कधींहि ज्यानें धर्म नियम तोडले नाहींत, त्यानें या विशिष्ट प्रसंगीं द्वन्द्व युद्धाचा नियम तोडला, हें दूषणावह नसून यावेळीं तें योग्यच जसें करावयास पाहिजे तसें केलेलें आहे.

ज्या राजकारणात पडलेल्या वीरावर असे प्रसंग येतील, त्यानीं त्यावेळीं असेंच आचरण केलें पाहिजे. थोरांचें आचरणच धर्माचा मार्ग दाखवीत असतें. त्याप्रमाणें रामाचें हें आचरण धर्माचा योग्य मार्ग दाखवीत आहे.

' भरत साम्राज्याचें पालन यथा योग्यरीतिनें करीत आहे व त्याच्या आज्ञेनें आम्ही या वनाचें रक्षण करीत आहों. येथें तूं आपल्या सख्ख्या भावाची बायको जी तुला आपल्या सुनेसारखी वाटली पाहिजे तिच्याशींच तू संबंध ठेवीत आहेस हें तू पाप केलें आहेस. या पापाचा दण्ड हा असा तुझा वध करून आम्ही तुला दिलेला आहे व तो अगदीं योग्य असाच आहे या कृत्याबद्दल आमच्या मनाला मुळींच पश्चात्ताप झालेला नाहीं ' असें रामानें निग्रहानें भाषण केलें. तें सुग्रीवानें ऐकलें व—

**दासास्मृगो त्वसि । रि० १८।४१**

'तूं तर बोलून चालून वानर आहेस' तेव्हां तुझा वध आडून केला काय व समोरून केला काय. त्यात कांहींच विचार करण्यासारखें नाहीं म्हणून आम्हीं जें केलें तें योग्यच केलें आहे. आणखी तूं लक्ष्यात ठेव कीं—

दुर्लभस्य च धर्मस्य जीवितस्य शुभस्य च।
राजानो वानरश्रेष्ठ प्रदातारो न संशयः॥ ४२॥
तान्न हिंस्यान्न चाक्रोशेन्नाक्षिपेन्नाप्रियं वदेत्।
देवा मानुषरूपेण चरन्त्येते महीतले॥ ४३॥
त्वं तु धर्ममविज्ञाय केवलं रोषमाश्रितः।
विदूषयसि मां धर्मे पितृपैतामहे स्थितम्॥ ४४॥
कि० स: १८

'राजे हे प्रजेला दुर्लभ धर्म, जीवित व अभ्युदय यांची प्राप्ति करून देत असतात. अशा राजाची हिंसा करूं नये, त्याची निंदा करूं नये, त्याचा अपमान करू नये व त्याना अप्रिय असेल तें ही कोणी करूं नये कारण राजे हे प्रत्यक्ष देवच, या भूतलावर मनुष्य रूपानेंच संचार करीत असतात. तूं धर्माविषयीं अगदींच अडाणी आहेस व मी तर वाडवडिलापासून चालत आलेल्या धर्माचें पालन करीत आहें, असें असता तूंच उलट येथें माझी निंदा करीत आहेस हें तुला मुळींच योग्य नाहीं.'

या प्रमाणें रामानें वालीला समर्पक्षगीत उत्तर दिलें. तेव्हां वालीच्या मनावरही त्याचा परिणाम झाला व आता परिस्थिति बदलत नाहीं व आपला मृत्यु तर अगदीं लवकरच होणार असें पाहून वाली म्हणाला—

प्रतिवक्तुं प्रकृष्टे हि नापकृष्टस्तु शक्नुयात्। कि० स० १८।४७

'हे रामा! तुझ्यासारख्या श्रेष्ठ पुरुषाच्यापुढें माझ्यासारखा निकृष्ट काय बरें उत्तर देऊ शकेल?' म्हणून मीं जें काय तुझ्यासमोर बोललों त्याची मला क्षमा कर तसेंच—

न चात्मानमहं शोचे न तारां नापि बान्धवान्।
यथा पुत्रं गुणज्येष्ठमंगदं कनकांगदम्। कि० १८।५२

' माझ्याविषयीं मला वाईट वाटत नाहीं. माझी पत्नी तारा हिच्याविषयीं मला खेद होत नाहीं. पण माझा प्रिय पुत्र अंगद आहे त्याच्याबद्दल मात्र मला अत्यंत हळहळ वाटत आहे. ' या माझ्या प्रिय पुत्राचें आपण संरक्षण करा म्हणजे झालें तसेंच ' सुग्रीव माझ्या प्रिय पत्नी तारेचा अपमान न करील असें करा ' म्हणजे झालें. '

## तारेचा शोक

वालीचा रामबाणानें मृत्यु झाला हें समजताच त्याची बायको तारा ही तेथें आली व त्या भूमीवर मरणोन्मुख स्थितींत पडलेल्या वालीला पाहून ती शोक करूं लागली. ती म्हणाली—

' तुझ्यासारखे श्रेष्ठ राजे भूमीवर शयन करीत नसतात सुग्रीवाच्या भार्येचा अपहार करून ज्याला जें तूं हाकून घातलेंस त्याचें हें फल तुला आज प्राप्त झालें आहे. ( कि० २१।५; ११ ) हे सुग्रीवा ! आता रुमा तुझी पत्नी तुला प्राप्त होईल व तिच्यासह तू आता सुखानें राज्याचा उपभोग घे. '

या तारेच्या शोकामध्यें सुग्रीवाची पत्नी रुमा ही वालीनें आपल्याकडे घेतली होती असें स्पष्ट म्हटलें आहे व आता ती सुग्रीवाची सुग्रीवाकडे जाईल याबद्दल तिला खात्री वाटत होती. अपहृत स्त्रीचा पुनः स्वीकार या जातीमध्यें केला जात असे असें यावरून स्पष्ट दिसतें. भावाजवळ राहिलेली बायको पुनः दुसऱ्या भावाकडे गेली व पुन. परत आली तर त्यात फारसें काहीं बिघडलें असें वानर जातीस वाटत नसावें असें दिसतें. हो गोष्टी नैतिक पातळी या कालामध्यें होती. राजघराण्यातील रुमा व तारा यांच्यासारख्या थोर स्त्रियाही अशा रीतिनें दोन-ही भावाकडे राहिल्या असल्याचें दिसतें. मग खालच्या थरांतील स्त्रियांची परि-स्थिति कशी असेल याची कल्पनाच करावी तारा व रुमा या विदुषी स्त्रिया होत्या अशिक्षित नव्हत्या. त्याना ही अशी अदलाबदल सह्य वाटत होती.

## सुग्रीवाचा शोक

वाली व सुग्रीव हे भाऊ भाऊ होते. वाली वडील भाऊ व सुग्रीव धाकटा

भाऊ वालीचा राज्यावर अधिकार होता धाकटा भाऊ असल्यामुळें सुग्रीवाचा अधिकार राज्यावर नव्हता. वाली लढाईमध्यें गुंतला होता, त्यावेळी काही अघटित घटनेमुळें ' वाली मेला ' असें सुग्रीवास व मंत्री मंडळास वाटलें. त्यानीं सुग्रीवास वाली मेला असें समजून गादीवर बसविलें. नंतर वाली विजयी होऊन आला व सुग्रीव राज्यावर बसल्याचें पाहून रागावला व सुग्रीवाचें म्हणणें मुळींच ऐकून न घेता त्यानें सुग्रीवास हाकून घातलें व आपण राज्यावर बसला सुग्रीवाचे जे चाहते होते त्यास कारावासात पडावें लागलें. या-मुळें सुग्रीवाच्या मनात वालीचा काटा काढावा व राज्य आपल्या आधीन व्हावें असें आलें

बायकोचें अपहरण झालें, हातीं आलेलें राज्य हातचें गेलें, आपण दैवो घडीस लागलों असें म्हणणारे राम व सुग्रीव याचें सख्य समानशील असल्या-मुळें झालें. रामानें सुग्रीवाला सहाय्य केलें व वालीचा काटा एका बाणानें निघाला. वाली मरेपर्यंत सुग्रीवाला बरें वाटत होतं. पण वाली मरताक्षणींच बंधु प्रेमाचा उमाळा सुग्रीवाच्या अन्त करणात आला व तो रडूं लागला याला नात्याचें स्वाभाविक प्रेम असें म्हणतात वास्तविक या वेळीं सुग्रीवाला राज्य व बायको परत मिळल्याबद्दल आनंद वाटला पाहिजे होता पण आनंद वाटणें दूरच राहिलें, याला या बंधुवियोगानें दुःखच झालें व तो आपलीच निन्दा करू लागला व वालीचे गुण आठवून आक्रोश करूं लागला. तो म्हणतो—

" माझा भाऊ वाली मेलेला पाहून, हे रामा ! मला फारच दु ख होत आहे ऋष्यमूक पर्वतावर कसल्याही विपन्न अवस्थेत राहत असताना मला आनंद वाटत होता पण आतां प्रत्यक्ष भाऊ मेलेला पाहून मला फारच अत्य दु ख होत आहे ... मी तुझा घात करणार नाहीं, तूं येथून निघून जा ( **न त्वा जिघांसामि, चरेति** ) असें तो मला म्हणाला होता हें त्याचें म्हणणें किती थोरपणाचें होतें...पण मी मात्र त्याचा वध करविला सारासार बन्धुत्व, मोठे-पण व धर्म वालीनें पाळला पण मी मात्र वानरस्वभाव प्रकट केला. "

**भ्रातृत्वमार्यभावश्च धर्मश्चानेन रक्षितः ।**
**मया क्रोधश्च कामश्च कपित्वं च प्रदर्शितम् ॥**
कि- २४।१२

'मी भ्रातृवधाचें हें कुलाचा नाश करणारें काम केलें आहे यामाठीं मी या राज्याला योग्य नाहीं' असें पुष्कळ तो पश्चात्ताप पाऊन बोलू लागला व शेवटीं रामाजवळ त्यानें अग्नि प्रवेश करून मरून जाण्यासाठीं आज्ञा मागितली, तेव्हा ती सुग्रीवाचा शोक पाहून रामाच्याही डोळ्यात अश्रु आले. इकडे सुग्रीवाचा शोक, इकडे तारेचा आक्रोश व इकडे अंगदाचें दुःख पाहून रामालाही कांहीं सुचेनासें झालें. तारा तर रडता रडता रामाला म्हणाली— 'रामा' तुला स्त्री विरहानें होणारें दुःख कसें असतें तें माहीत आहे तू वालीला मारून माझी व वालीची ताटातूट केलीस व वालीला व मला विरह दुःखात लोटून दिलेंस आता माझा वध कर म्हणजे मी वालीला जाऊन भेटेन व त्याचें विरह दुःख दूर करीन' (कि० २४।३५-३७)

असा तेथें सर्वत्र शोक चालला असताना राम तारेला म्हणाला (**न शूर-पत्न्यः परिदेवयन्ति**) वीराच्या पत्न्या शोक करीत बसत नाहींत. हे तारे तूं वीर पत्नी आहेस तेव्हा शोक करणें तुला योग्य नाही.

## वालीचें और्ध्व देहिक

रामानें सर्वांचें सान्त्वन केलें व होणाऱ्या गोष्टी घडून गेल्या. शोक करीत बसण्यानें त्या आता पुन: सुधरणार नाहीत. आता मृताचें और्ध्वदेहिक कृत्य करावयास लागा असें रामानें सर्वांस सांगितलें व तेथें जमलेल्या सर्वांनीं सत्य-स्तव नाहा हें पाहून मान्य केलें व वालीला पालखींतून स्मशानात नेऊन तेथें-

**ततोऽग्निं विधिवद्दत्वा सोऽपसव्यं चकार ह । कि २५।४०**

'अंगदानें त्यास अग्नि दिला अपसव्य प्रदक्षिणा केली. सर्व वानर वालीला उदक देण्यासाठीं नदीवर गेले व तेथें त्यांनीं वालीला जल दिलें व तर्पण केलें

नंतर सुग्रीवाला राज्याभिषेक केला, अंगदाला यौवराज्याभिषेक झाला सुग्रीवानें अत्यंत आग्रह केला तरीहि १४ वर्षे नगरात व घरांत राहणार नाहीं तर वनांत राहीन, अशी प्रतिज्ञा केली असल्यामुळें राम किष्किंधा नगरींत गेला नाहीं. वनातच त्यानें मुक्काम केला. लक्ष्मण मात्र राज्यारोहण समारंभाला उपस्थित राहिला होता.

## सुग्रीवाचा राज्याभिषेक

सुग्रीवाच्या राज्याभिषेकाची तयारी किती उत्तम केली होती तें पहा.

> रत्नैर्वस्त्रैश्च भक्ष्यैश्च तोषयित्वा द्विजर्षभान् ॥ २९ ॥
> मन्त्रपूतेन हविषा हुत्वा मन्त्रविदो जनाः ॥ ३० ॥
> प्रासादशिखरे रम्ये चित्रमाल्योपशोभिते ॥ ३१ ॥
> प्राङ्मुखं विधिवन्मन्त्रैः स्थापयित्वा वरासने ।
> नदीनदेभ्यः संहृत्य तीर्थेभ्यश्च समंततः ॥ ३२ ॥
> आहृत्य च समुद्रेभ्यः सर्वेभ्यो वानरर्षभाः। कि० स० २६

'रत्नें, वस्त्रें व भोजनें यांनी ब्राह्मणांना संतोषविलें. मन्त्रवेत्त्या लोकांनीं मंत्र म्हणून हवन केलें. उत्तम आसनावर राजभवनामध्यें सुग्रीवाला बसविलें व नदी नद व समुद्र यातून आणलेल्या पवित्र जलानें त्याला राज्याभिषेक केला.'

या प्रमाणें राज्य प्राप्त झालें व आपली पत्नी रुमा पुन प्राप्त झाली म्हणून सुग्रीवाला फार आनंद झाला. इकडे सुग्रीव [illegible] बन्धुजवळ असलेल्या रुमेचा पत्नी व राणी म्हणून स्वीकार करीत आहे व तेथेंच पहावें तर सर्व ब्राह्मण त्याच्या घरी जातात व समंत्रक राज्याभिषेक करतात व त्याच्या घरीं जेवीतही आहेत. हें केवळ जरी द्विजांनीं बनवलें असें मानलें तरी रुमेच्या पुनः स्वीकाराला कोणीच निंदिलेलें नाहीं.

## सुग्रीव, रुमा व तारा

वालीचा वध 'तो भावाच्या बायकोशीं रमत होता' या अपराधासाठीं रामानें केला. पण सुग्रीवही तेंच करीत आहे. पहा—

**रुमां च पत्नीं अभिप्रेतां तारां चापि समीप्सिताम् ।**
**विहरन्तमहोरात्रं कृतार्थं विगतज्वरम् ॥ ४ ॥**
**मन्त्रिषु न्यस्तकार्यं च मन्त्रिणामनवेक्षकम् ॥ ५ ॥** किं० स० २९
**तारया सहितः कामी सक्तः कपिवृषस्तथा**
किं० स० ३१।२३

' सुग्रीवाला आपली पत्नी रुमा प्राप्त झाली व इष्ट असलेली ताराही त्याला प्राप्त झाली यामुळें निश्चित होऊन तो त्या सर्व स्त्रियांशीं रात्र दिवस रमू लागला. सर्व राज्याचा कारभार मन्त्र्यावर त्यानें सोंपविला व मंत्र्यांच्या कामावर देखरेख ठेवणेंही त्यानें सोडून दिलें. '

भावाची बायको जवळ करणें हें वालीचें पाप जर मानलें व त्यासाठीं ' त्याचा वध आम्ही सम्राट भरताचे प्रतिनिधी म्हणून केला तो अगदीं योग्य केला व याबद्दल आमच्या मनात मुळींच विषाद वाटत नाहीं. ' हें रामाचें म्हणणें जर खरें मानलें व धर्मरक्षण करण्यासाठीं हें सर्व रामानें केलें असें जर मानलें तर, सुग्रीव रामाच्या समोरच वालीच्या बायकोला जवळ करीत आहे व राज्यकारभाराकडे लक्षही देत नाहीं, पण हें राम प्रत्यक्ष दिसत असताही सहन करीत आहे ! म्हणूनच आम्ही पूर्वी म्हटलें होतें कीं हीं वालीवधासाठीं म्हणून दिलेलीं कारणें राजकीय स्वार्थाच्या स्वरूपाचीं आहेत.

सुग्रीवानें तारेचा स्वीकार केला असें वाल्मीकि ऋषि लिहित आहेत व तारेवर ( तारा समीप्सिता ) सुग्रीवाचे मन पूर्वीपासून होतें असेंही ते सांगत आहेत पण वाली मेल्यावर तारा निराधार राहिली म्हणून, किंवा तिच्यावर हक्क सांगणारा कोणी राहिला नाहीं म्हणून सुग्रीवानें तिचा स्वीकार केला असें सुग्रीवाच्या बाजूनें म्हणता येईल. रुमेवर वालीनें हात टाकला तेव्हा सुग्रीव जिवंत होता. म्हणून तो वालीचा दोष व आता वाली जिवंत नाहीं म्हणून तारेचा स्वीकार करण्यांत सुग्रीवाचा दोष नाहीं असें सुग्रीवाच्या बाजूनें म्हणता येईल. तसेंच जेव्हा वाली मेला असें समजून सुग्रीवानें राज्याचा स्वीकार केला होता, तेव्हा ही तारा सुग्रीवाजवळ आलीच होती. तीहि वाली जिवंत नाहीं अशा समजुतीनें ते

कृत्य धर्म्य होईल एकंदरीत वानर जातींत वेदवेत्ते व संस्कृत भाषेवर प्रभुत्व दाखवणारे विद्वान् होते, तारा ही विदुषी व राजकारणपटु होती, मृतक संस्कार व राज्यारोहण संस्कार हे जरी यांचे वेदमंत्रानीं होत होते, तरी यौनं-त्रिक नीति ही यांची अशी होती. हें येथें स्पष्ट दिसून

## सूज्ञ हनुमान.

मन्त्र्यामध्यें हनुमान फार सूज्ञ होता. वालीचा वध हा पावसाळ्याच्या प्रारंभीं झाला असल्यामुळें सीतेचा शोध पावसाळ्यात करता येणें शक्य नव्हतें. म्हणून पर्णकुटींत रामलक्ष्मण व अन्तःपुरात सुग्रीव चार महिनें स्वस्थ राहिले हें योग्यच झालें. पण पावसाळा संपतांच मित्र कार्याला लागावें अशी सूचना हनुमानानें सुग्रीवाला केली व सर्व वानर-मुख्यानीं अमुक मुदतीमध्यें किष्किंधेला यावें अशी आज्ञा सुग्रीवाकडून सुटली हें योग्यच झालें. पण याची बातमी रामाला यावयाची ती दिलेली नव्हती. यामुळें रामाला अस्वस्थता वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. यामुळें राम त्रासून लक्ष्मणाला म्हणत आहे—

> अनाथो हृतराज्योऽयं रावणेन च धर्षितः ।
> दीनो दूरगृहः कामी मां चैव शरणं गतः ॥ ६७ ॥
> इत्येतैः कारणैः सौम्य सुग्रीवस्य दुरात्मनः ।
> अहं वानरराजस्य परिभूतः परंतप ॥ ६८ ॥
> स कालं परिसंख्याय सीतायाः परिमार्गणे ।
> कृतार्थः समयं कृत्वा दुर्मतिर्नावबुध्यते ॥ ६९ ॥ कि० स० ३०

' दुष्ट सुग्रीव असें समजत आहे कीं राम अनाथ झाला आहे, त्याचें राज्य-हरण झालें आहे, रावणानें त्याचा अपमान केला आहे, त्याचें घर फार दूर आहे, काम विकारानें तो गांजला आहे यामुळे दीन होऊन तो मला शरण आलेला आहे. असें समजून तो दुष्ट सुग्रीव माझ्या कार्याकडे दुर्लक्ष्य करीत असावा असें दिसतें. म्हणूनच वचन दिलें असताही सीतेचा शोध करण्याचें काम तो अजून करूं लागला नाहीं.

म्हणून हे लक्ष्मणा ! तू किष्किंधा नगरीमध्यें जा व सुग्रीवाला सांग कीं ' माझ्या बाणाचा चमत्कार पहावा अशी इच्छा तुला झाली आहे कीं काय तें सांग. '

न स सङ्कुचितः पन्था येन वाली हतो गतः ।
समये तिष्ठ सुग्रीव मा वालिपथमन्वगाः ॥ ८१ ॥
एक एव रणे वाली शरेण निहतो मया ।
त्वां तु सत्यादतिक्रान्तं हनिष्यामि सबांधवान् ॥ ८० ॥
कि० स० ३०

' ज्या मार्गानें वाली गेला तो लहान मार्ग नाहीं. तुझ्यासारखे हजारों लोक जातील इतका तो विस्तृत मार्ग आहे. माझ्या बाणानें एकटा वालीच ठार झाला. आता मला कोप आला तर सर्व भाऊबंधासह तुला ठार करीन हें नीट समजून ठेव. '

रामाचें हें भाषण म्हणजे सुग्रीवाच्या डोळ्यात चरचरीत अंजन घालण्या-सारखेंच होते. हे रामाचा आत्मविश्वास व बाणेदारपणा दाखवीत आहे. सुग्रीव कामी रत होऊन अन्तःपुरातच राहत होता व राज्यशासनाकडे दुर्लक्ष करीत होता हें खरें आहे. पण हनुमानाच्या सूचनेप्रमाणें त्यानें सीतेचा शोध करण्यासाठीं वानराना बोलावून घेतलें होतें हें रामाला माहीत नव्हतें. म्हणून रामाला क्रोध येणेंही अगदीं योग्य होतें. क्रोधित होऊन रामानें जेव्हा असा निरोप लक्ष्मणाला सांगितला तेव्हा स्वभावतः क्रोधी असलेला लक्ष्मण अधिकच रागावला व ( निहन्मि सुग्रीवं असत्यं अद्य । कि०स० ३१।४ ) ' आताच त्या असत्य प्रतिज्ञा करणाऱ्या सुग्रीवाला ठार मारून टाकतों ' असें म्हणाला. तेव्हा रामानें त्याला शांत होण्याचा उपदेश केला व ' इतका रागावूं नकोस शान्तपणानेंच काय निरोप सांगावयाचा तो सांग, ' असें सांगितलें तरी लक्ष्मणाचा राग कमी झाला नाहीं. तथापि रामाची आज्ञा म्हणून तो शांतपणानें निघाला. त्याची त्या वेळची उग्रता पाहणाऱ्यास धडकी भरून यावी अशी होती. त्याप्रमाणें रस्त्या-वरून लक्ष्मण जाऊं लागला असता ज्यांनीं त्याला पाहिलें त्याना भय वाटलें. इतका

उग्रपणा त्याच्या चेहऱ्यावर आला होता असा तो अत्यंत रागावलेला लक्ष्मण राजभवनामध्यें प्रविष्ट झाला. सुग्रीवाच्या राजभवनाला सात चौक ओलंडावे लागले. तेव्हां सुग्रीव आठव्या चौकात होता तेथें लक्ष्मण पोंचू शकला तेथें स्त्रिया असल्यानें तो जेथें स्त्रिया नव्हत्या त्या ठिकाणीं उभा राहिला व तेथेंच आपल्या धनुष्याचा टणत्कार करूं लागला. धनुष्याचा टणत्कार ऐकून सुग्रीव देहभानावर आला. आपल्याजवळ असलेल्या तारेला म्हणाला तूच पुढें हो, व लक्ष्मणाजवळ जा व हास्य मुखानें मृदु शब्दानीं आधीं त्याचा राग दूर कर. सज्जन स्त्रियांना पहून रागवत नाहींत.

जी तारा वालीच्या प्रेताबरोबर मरण्यास तयार झाली होती, तीच ही तारा मद्यपानानें ( मदविह्वलाक्षी ) झिंगलेली आपले कपडे व आभूषणें अस्ताव्यस्त झालेल्या स्थितींत सुग्रीवाच्या आज्ञेनें सुग्रीवासाठीं रदबदली करण्यासाठीं लक्ष्मणासमोर जाऊ लागली आहे ! वालीच्या मृत्युनंतर यांच तारेचा प्राणान्तिक आक्रोश लक्ष्मणानें ऐकला होता. तोच लक्ष्मण या वेळीं सुग्रीवाचें हित करण्यासाठीं तारा तयार झालेली आहे हें पाहून मनात काय म्हणाला असेल बरें ?

## मोहक स्त्री

सुग्रीवानें तारेलाच पुढें पाठवण्याचें कारण ती ( प्रियदर्शना तारा ) ती दिसावयास अत्यंत सुंदर होती. सुन्दर स्त्री पुढें आली असता तिच्या मोहकतेमुळें पुरुष कितीहि रागावला असला तरी त्याचा राग कमी होतो. म्हणून सुग्रीवानें तारेला पुढें जा व लक्ष्मणाला मधुर भाषणानें शांत कर म्हणून सांगितलें.

सुग्रीव व तारा हीं दोघें ही मद्यपानानें अत्यंत झिंगलेली होतीं. त्यांस सरळ उभें राहण्याचीही शक्यता नव्हती. इतक्या मद्यपानानंतर यांचे संबंध कसे असतील हें सहज समजण्यासारखें आहे. प्रातः स्मरणीय पंच कन्यामध्यें या तारेची गणना झालेली आहे असें कित्येकास वाटतें. पण पंच कन्यातील तारा ही वालीची पत्नी नसून ती तारा दुसरी कोणती तरी असेल असें वाटतें.

ही तारा लक्ष्मणाजवळ जाऊन हास्य करून त्याला म्हणाली- 'आपण रागावलात का ? कोण बरें आपल्या आज्ञेचें उल्लंघन करीत आहे ?'

हें ऐकून लक्ष्मण तारेला म्हणाला— ( **भर्तृहिते युक्ते ते भर्ता काम-वृत्तः लुप्तधर्मार्थसंग्रह** । कि० ३३।४३ ) पतिचें हित करण्याविषयीं तत्पर असलेल्या तारा बाई ! तुझा भर्ता कामलुब्ध होऊन आपले कर्तव्य करीत नाहीं हें तुला माहीत नाहीं काय ? येथें लक्ष्मणानें तारेशीं बोलताना 'तुझा नवरा' असेंच सुग्रीवासंबंधान म्हटलेलें आहे अर्थात् वालीची ही स्त्री आता सुग्रीवाला पति मानून राहत आहे ही वार्ता लक्ष्मणापर्यंत पोचली होती असें उघड होतें

तारेनें चातुर्यानें लक्ष्मणाला प्रसन्न करून त्याला अन्त पुरात नेलें व जाता जाता सुचविलं कीं सुग्रीवानें वानरातील प्रमुख वानर बोलावले आहेत व तो सीतेचा शोध कसा करावा त्या गोष्टीचा विचार करीत आहे

असें बोलत लक्ष्मण आत जात आहे इतक्यात त्याम रुमेला आलिंगन देऊन बसलेला सुग्रीव दिसला. सुग्रीव व लक्ष्मण यांची दृष्टादृष्ट होताच सुग्रीवाची किती गाळण झाली असेल याची कल्पनाच वाचकानीं करावी दोघाचीं बोलणीं झाली त्यात लक्ष्मणानें सुग्रीवास बजावलें कीं-

**न स संकुचित' पन्था येन वाली हतो गतः**
**समये तिष्ठ सुग्रीव मा वालिपथमन्वगाः ॥ १८ ॥**

कि० स० ३४

'वाली ज्या मार्गानें गेला तो काहीं मार्ग बंद झालेला नाहीं यासाठीं सुग्रीवा ! तूं आपल्या प्रतिज्ञेचें पालन कर वालीच्या मार्गानें जाऊ नकोस '

रागावलेल्या लक्ष्मणाला शान्त करण्यासाठीं राम व सुग्रीव यास परस्परांच्या सहाय्याची कशी गरज आहे व सुग्रीवाच्या मदतीशिवाय एकट्या रामाकडून रावणाचा पराभव होणें किती अशक्य आहे तें सर्व मोठ्या युक्तिनें यावेळीं वर्णन केलं व यावेळीं सुग्रीव व राम यांचीं मैत्रीच वाढावी म्हणजे इष्ट कार्य घडून येईल हें फार काळजीपूर्वक पण सौम्य शब्दानीं लक्ष्मणापुढे निवेदन केलें हें सर्व तारेचें फार चातुर्यानें केलेलं वक्तृत्व पाहण्यासारखें आहे.

नंतर लक्ष्मण शान्त झाला. सुग्रीव व लक्ष्मण यांची सीतेच्या शोधासबंधानें बोलणीं झालीं व थोड्याच वेळानें लक्ष्मण व सुग्रीव रामाजवळ गेले व राम व सुग्रीवाचें बोलणें झालें. या भाषणामध्यें सुग्रीवानें सांगितलें कीं आपली वानर सेना जी सीतेच्या शोधाला पाठावयाची आहे ती आलेली आहे. आता तुझें कार्य झालेंच असें समज. सीता कोठेही असली तरी तिला हे वीर शोधून काढतील व मग त्या दुष्टाचा नाश करण्याचें कार्य आपण करूं '

हें ऐकून रामाला फार आनंद झाला व सुग्रीवानें आपल्या धाडशी वानरांस निवडून चारही दिशांना पाठवलें. याप्रमाणें सीतेचा शोध सुरू झाला.

दक्षिण दिशेला हनुमान, अंगद वगैरे वानर गेले होते. त्यांच्या मार्गांत अनेक अडचणी आल्या, पण त्या दूर करून दक्षिण समुद्रापर्यंत ते गेले. तत्पूर्वी संपातीनें लंकेसंबंधी बरीच माहिती त्यास सांगितली. ती ऐकून येऊन दक्षिण समुद्रतीरावर पोंचलेले हे वानर समुद्राचें उल्लंघन करून कोणी जावें याचा विचार करूं लागले. बरीच भवति न भवति झाली व हनुमानानेंच जावें असें ठरलें व त्या प्रमाणें हनुमान समुद्राचें उल्लंघन करण्यास सिद्ध झाला.

## अंगदाचें सुग्रीवासंबंधाचें मत

अंगद यावेळीं हनुमानाला म्हणत आहे—

स्थैर्यमात्ममनः शौचं आनृशंस्यमथार्जवम् ।
विक्रमश्चैव धैर्यं च सुग्रीवे नोपपद्यते ॥ २ ॥
भ्रातुर्ज्येष्ठस्य यो भार्यां जीवतो महिषीं प्रियाम् ।
धर्मेण मातरं यस्तु स्वीकरोति जुगुप्सितः ॥ ३ ॥
कथं स धर्मं जानीते येन भ्रात्रा महात्मना ।
युद्धायाभिनियुक्तेन बिलस्य पिहितं मुखम् ॥ ४ ॥
सत्यात्पाणिगृहीतश्च कृतकर्मा महायशाः ।
विस्मृतो राघवो येन स कस्य सुकृतं स्मरेत् ॥ ५ ॥
लक्ष्मणस्य भयेनेह नाधर्मभयभीरुणा ।
आदिष्टा मार्गितुं सीता धर्मस्तस्मिन् कथं भवेत् ॥ ६ ॥

तस्मिन्पापे कृतघ्ने तु स्मृतिभिन्ने चलात्मनि ।
आर्यः को विश्वसेज्जातु तत्कुलीनो विशेषतः ॥ ७ ॥
राज्ये पुत्रं प्रतिष्ठाप्य सगुणो विगुणोऽपि वा ।
कथं शत्रुकुलीनं मां सुग्रीवो जीवयिष्यति ॥ ८ ॥ कि० स० ५५

अंगदाच्या मनामध्यें सुग्रीवाच्या संबंधानें कोणते विचार घोळत होते तें त्याच्या या भाषणामध्यें प्रकट होत आहे म्हणून हें त्याचें भाषण पहा—' विचारांची स्थिरता, मनाची पवित्रता, सज्जनपणा, सरळपणा, पराक्रम व धैर्य हीं सुग्रीवामध्यें मुळा कधींच नव्हतीं आहो, वडील भावाची पत्नी पट्टराणी, धर्मानें मातेसारखी असताही, वडील भाऊ जिवंत असताना तिचा हा स्वीकार करतो, तो धर्माची पर्वा कशी करणार बरें ? माझे वडील शत्रूशीं युद्ध करण्यासाठीं गुहेंत गेले असता व याला दारावर रक्षणासाठीं उभे केलें असता जो दुष्ट त्या गुहेचें दार बंद करतो, तसेंच हस्तग्रहणपूर्वक ज्याच्याशीं मैत्री केली व ज्यानें आपलें कार्यही केलें त्या रामाचेंही उपकार जो विसरला व विषय भोगातच जो रमूं लागला, त्यानें धर्म रक्षणासाठीं नव्हेच, पण लक्ष्मणाच्या भीतीनें आम्हा वानरांना सीतेच्या शोधासाठीं देशोदेशीं पाठवलें आहे. त्याच्या ठिकाणीं धर्म कसा असणार ? पापी, दुरात्मा, कृतघ्न, चंचल अशा या सुग्रीवावर कोण सज्जन पुरुष विश्वास ठेवील बरें ? सुग्रीव सद्गुणी असो वा दुर्गुणी असो तो शत्रु कुलांत उत्पन्न झालेल्या मला राज्यावर बसवून कधींहि जगविणार नाहीं '

अर्थात् मी मरून जावें असेंच त्याच्या मनांत असणार. हे विचार वालीपुत्र अंगदाचे आहेत. यावरून सुग्रीवासंबंधानें अंगदाला व अंगदाच्या पक्षाच्या लोकांना काय वाटत होतें तें व्यक्त होत आहे. साहजीकच आहे ज्यानें आपल्या बापाचा वध करविला, बापवडिलांचें राज्य बळकावलें त्या संबंधानें अंगदाला व त्याच्या पक्षाच्या लोकांना कसें बरें वरें वाटेल. सुग्रीवानें अंगदाला यौवराज्याभिषेक केलेला होता तथापि अंगदाला त्याची स्थिरता वाटत नव्हती. कांहीं तरी उपायानें आपला नाश हा सुग्रीव करवील असें भय त्याला वाटत असावें. व्यवहाराच्या दृष्टीनें तें योग्यही होतें.

*

या किष्किंधाकांडातील मुख्य भाग म्हणजे रामाची सुग्रीवाशीं मैत्री होणें व वालीचा वध करणें. हें रावण साम्राज्याच्या नाश करण्यासाठीं अत्यंत आवश्यक होतें. अशा या दोन फारच महत्वाच्या घटना आहेत. वालीच्या मृत्युमुळें रावणाचें अर्धे बल कमी झालें व सुग्रीवाच्या मैत्रीनें रामाचें बल दुप्पट वाढलें. या दोन घटनामुळें रामाचें सामर्थ्य वाढलें व रावणाचें कमी झालें. याचप्रमाणें राजकारणात पडणारानीं आपलें बल वाढवलें पाहिजे व शत्रुचें बल कमी केलें पाहिजे व शेवटीं आपला विजय होईल असें केलें पाहिजे. या कांडात आणखीही पुष्कळ बारीक सारीक गोष्टी आहेत. त्याकडे वाचकानीं वाचताना लक्ष्य द्यावें व राजकीय दृष्टीनें या इतिहासाचें निरीक्षण करावें

## बैलाची उपमा

राम लक्ष्मणाला येथें बैलाची उपमा दिली आहे ती अशी—

**वृषभश्रेष्ठविक्रमौ ॥ १० ॥**
**समदाविव गोवृषौ ॥ १४ ॥** कि. ३

हनुमान रामलक्ष्मणाकडे आल्याबरोबर तुम्ही दोघेही उत्तम बैलाप्रमाणें दिसत आहांत असें म्हणत आहे. आज असें कोणी प्रथमच म्हटलें तर तें कोणासही सहन होणार नाहीं. वेदामध्येंही इन्द्र वगैरे देववीरांना 'बैल' म्हणून वर्णिलें आहे ही उपमा सध्या कोणालाही आवडणार नाहीं. ज्या काळामध्यें गाय व बैल याचा मान फार होता त्या काळातील या उपमा आहेत. आज आपल्यामध्यें गोभक्ति किंवा बैलाची भक्ति कमी झालेली आहे. शेत नांगरणीचें काम जेव्हा ट्रॅक्टरनें केलें जाईल तेव्हा याहीपेक्षा बैलाची भक्ति कमी होईल.

## सुवर्णाचा रंग

शरीर वर्णनामध्यें आलेला 'सुवर्ण' शब्द हा सोन्याचा वाचक नसून 'सुशोभित वर्ण' या वाचक आहे

**धैर्यवन्तौ सुवर्णाभौ ॥ ८ ॥** कि० स० ३

श्री रामचन्द्र श्यामवर्ण होते व लक्ष्मण गौरवर्ण होता. या दोघांपैकी कोणीही सुवर्णाप्रमाणे कांतीचा नव्हता. तथापि येथें '**सुवर्णाभौ**' असें म्हटलेलें आहे. म्हणूनच याचा अर्थ 'उत्तम शरीरकांती असलेले' असा आहे. 'सुवर्णाच्या रंगासारखे' असा याचा अर्थ नव्हे

## वानरवेष

वानर जातीचा वानरासारखा वेष असे. हनुमान जेव्हा राम लक्ष्मणाला भेटण्यास ऋष्यमूक पर्वतावरून खाली उतरला, तेव्हा त्यानें तापशाचा वेष धारण केला होता पहा—

**कपिरूपं परित्यज्य हनुमान्मारुतात्मजः ।**
**भिक्षुरूपं ततो भेजे शठबुद्धितया कपिः ॥ २ ॥** कि. स. ३

हनुमानानें रामलक्ष्मणाजवळ जावयाच्या वेळीं वानर वेष काढून ठेवला व भिक्षुरूपाचा वेष धारण केला व तो रामलक्ष्मणाजवळ आला. आपण कोण आहों हे रामलक्ष्मणाना समजूं नये म्हणून हनुमानानें असें केलें यावरून स्पष्ट होत आहे कीं हा एक प्रकारचा वेष असे. रामलक्ष्मणाला भेटून जेव्हा तो परत सुग्रीवाकडे निघाला, तेव्हा भिक्षुरूप टाकून वानररूप धारण केलें असे पुनः म्हटलें आहे. या वरून हा वेष आहे असें स्पष्ट होत आहे

**भिक्षुरूपं परित्यज्य वानरं रूपं आश्रितः ॥ ३४ ॥** कि. स. ४

भिक्षुरूप टाकून हनुमानानें पुनः कपिरूप धारण केलें.

# किष्किन्धाकाण्डांतील

# सुभाषितें



१ नेदृशानां मतिर्मन्दा भवत्यकलुषात्मनाम् — निर्मळ मनाच्या पुरुषाची मती कधींहि मन्द होत नसते ( १।११६ )

२ अतिस्नेहपरिष्वंगात् वर्तिरार्द्रापि दह्यते— अति स्नेहाचा संबंध झाल्यामुळें भिजलेली वातही जळूं लागते ( १।११७ ) [ स्नेह—तेल, प्रेम ]

३ स्वास्थ्यं भद्र भजस्व, आर्य त्यज्यतां कृपणामतिः — धैर्याचें अवलंबन कर, हे कल्याणसंपन्न श्रेष्ठ पुरुषा ! हे धैर्य खचविणारे विचार सोडून दे. ( १।१२२ )

४ उत्साहो बलवान्, आर्य, नास्त्युत्साहात्परं बलम्— हे आर्या ! उत्साहाचें सामर्थ्य अधिक आहे. उत्साहासारखें दुसरें बल नाहीं ( १।१२३ )

५ सोत्साहस्य हि लोकेषु न किंचिदपि दुर्लभम्— उत्साही मनुष्याला या लोकामध्यें कांहींही दुष्प्राप्य नाहीं. ( १।१२२ )

५ उत्साहवन्तः पुरुषा नावसीदन्ति कर्मसु— उत्साही पुरुष कसलेंही कार्य करावयाचें झालें तरी खचून जात नाहींत ( १।१२३ )

७ बुद्धिविज्ञान संपन्न इंगितैः सर्वमाचर— बुद्धि व ज्ञान यांनी युक्त होऊन तूं सर्व कर्तव्यें करीत जा. ( २।१८ )

८ न ह्यबुद्धिं गतो राजा सर्वभूतानि शास्ति— बुद्धिचें अवलंबन न करणारा राजा सर्व प्रजेवर अधिकार चालवण्यास समर्थ होत नाहीं. ( २।१८ )

९ विश्वासो नात्र हि क्षम — येथें (अनोळखी माणसावर) विश्वास ठेऊं नये हेंच उत्तम (२।२१)

१० अरयश्च मनुष्येण विज्ञेयाश्छद्मचारिण — कपटानें संचार करणारे शत्रु मनुष्यानें ओळखले पाहिजेत (२।२२)

११ विश्वस्तानामविश्वस्ताश्छिद्रेषु प्रहरन्त्यपि — विश्वास ठेवून स्वस्थ बसणाऱ्यावर त्यांचीं छिद्रें पाहून हे शत्रु प्रहार करीत असतात. (२।२२)

१२ भवन्ति प्रहर्तारस्ते ज्ञेयाः प्राकृतैर्नरैः — संधि साधून प्रहार करणाऱ्या शत्रूंचा साधारण लोकाकडून शोध केला पाहिजे (८३।२३)

१३ गुणगणैर्युक्ता यस्य स्यु कार्यसाधकाः तस्य सिध्यन्ति सर्वेऽर्थाः — ज्याच्याजवळ सर्व गुणसंपन्न कार्यकर्ते असतात त्याचीं सर्व कार्ये सिद्ध होतात (३।२५)

१४ व्यसने वार्थकृच्छ्रे वा भये वा जीवितान्तगे । विमृशंश्च स्वया बुद्धया धृतिमान्नावसीदति ॥ — कष्ट झाले, धनाची हानि झाली, जीविताचा नाश करणारें भय प्राप्त झालें असताही जो स्वतःच्या बुद्धिनें विचार करतो तो धैर्यवान् मनुष्य नाश पावत नाहीं (८।९)

१५ यालिशस्तु नरो नित्यं वैक्लव्यं योऽनुवर्तते । स मज्जत्यवशो शोके भाराक्रान्तेव नौर्जले — जो मूर्ख माणूस नेहेमीं खेद करीत बसतो तो भार अधिक झाल्यामुळें बुडणाऱ्या नौकेप्रमाणें शोकामध्यें बुडून जातो. (८।१०)

१६ शोकेनाभिप्रपन्नस्य जीविते चापि संशयः — शोक करीत बसणाऱ्याला आपल्या जीविताविषयींहि संशय उत्पन्न होतो. (८।१३)

१७ शोकं त्यज, धैर्यमाश्रय केवलं — शोक सोड व शुद्ध धैर्य धारण कर. (८।१३)

१८ निश्चला भवति प्रीतिः धैर्यं आत्मवतां — स्वावलंबी पुरुषाची प्रीति व धैर्य हीं स्थायी असतात (८।६)

१९ रजतं वा सुवर्णं वा शुभान्याभरणानि च। अविभक्तानि साधूनामवगच्छन्ति साधवः — सोनें रुपें व आभूषणें यांत श्रेष्ठ लोक आपसांत आपपरभाव मानीत नाहींत ( ८।७ )

२० आढ्यो वापि दरिद्रो वा दुःखितः सुखितोऽपि वा। निर्दोषश्च सदोषश्च वयस्यः परमा गतिः — मित्र सधन असो वा दरिद्री असो, सुखी असो वा दुःखी असो, निर्दोष असो सदोष असो, तोच मोठा आश्रय आहे ( ८।८ )

२१ धनत्यागः सुखत्यागो देशत्यागोऽपि वानघ। वयस्यार्थे प्रवर्तन्ते स्नेहं दृष्ट्वा तथा विधम्। — जेथें प्रेम दिसून येतें त्या मित्रासाठीं धन सुख व देश यांचाही त्याग केला जातो ( ८।९ )

२२ उपकारफलं मित्रं, अपकारोऽरिलक्षणम् — उपकार हें मित्राचें व अपकार हें शत्रूचें लक्षण आहे ( ८।२१ )

२३ दुःखितः सुखितो वापि सख्युर्नित्यं गतिः — दुःखी असला किंवा सुखी असला तरी मित्रच मित्राचा आश्रय आहे ( ८।४० )

२४ नयश्च विनयश्चोभौ निग्रहानुग्रहावपि। राजवृत्तिरसंकीर्णा न नृपाः कामवृत्तयः ॥— न्याय, विनय, शत्रुचा निग्रह, सज्जनावर अनुग्रह ही राजाची वागणूक असावी राजे स्वेच्छाचारी नसावे। ( १७।३२ )

२५ राजहा ब्रह्महा गोघ्नः चोरः प्राणिवधे रतः। नास्तिकः परिवेत्ता च सर्वे निरयगामिनः ॥ सूचकश्च कदर्यश्च मित्रघ्नो गुरुतल्पगः। लोकं पापात्मनामेते गच्छन्ते नात्र संशयः ॥— राजाचा घात करणारा, ब्रह्मघातकी, गोघातकी, चोर, प्राण्याचा वध करण्यांत रमणारा, नास्तिक, ज्येष्ठ भावाच्या पूर्वी विवाह करणारा, चहाडी करणारा, कृपण, मित्रघातकी, गुरुपत्नीशीं रत होणारा हे सर्व नरकांत जातात ( १७।३६-३७ )

२६ ज्येष्ठो भ्राता पिता वापि यश्च विद्यां प्रयच्छति। त्रयस्ते पितरो ज्ञेया धर्मे च पथि वर्तिनः — वडील भाऊ, बाप व जो विद्या शिकवतो हे तिघे धर्मानें चालणाऱ्याचे वडील आहेत ( १८।१३ )

२७ यवीयानात्मनः पुत्रः शिष्यश्चापि गुणोदितः। पुत्रवत्ते त्रयश्चिन्त्याः— लहान भाऊ, स्वतः चा मुलगा व गुणी शिष्य याना मुला-प्रमाणें मानलें पाहिजे. ( १८।१४ )

२८ औरसीं भगिनीं वापि भार्यां वाप्यनुजस्य यः। प्रचरेत नरः कामात्तस्य दण्डो वधः स्मृतः॥— आपल्या कन्येशीं, बहिणीशीं व धाकट्या भावाच्या पत्नीशीं जो रममाण होत असेल त्याचा वध करावा ( १८।२३ )

२९ राजभिर्धृतदण्डाश्च कृत्वा पापानि मानवाः। निर्मलाः स्वर्गमायान्ति सन्तः सुकृतिनो यथा॥— मनुष्यांच्या हातून पाप झालें असता राजानीं त्याना दण्ड केला म्हणजे ते पुण्यवान् पुरुषाप्रमाणें स्वर्गाला जातात. ( १८।३२ )

३० शासनाद्वापि मोक्षाद्वा स्तेनः पापात्प्रमुच्यते। राजा त्वशासन्पापस्य तदेवाप्नोति किल्बिषम्॥— राजाला समजल्यावर राजानें शासन केल्यास अथवा सोडून दिल्यास चोर वा पापी पापापासून मुक्त होतो. पापी मनुष्याला राजानें शासन न केलें तर तो राजा पापी होतो. ( १८।३३ )

३१ प्रायश्चित्तं च कुर्वन्ति तेन तच्छाम्यते रजः- जे प्रायश्चित्त करतात त्यांचें पाप दूर होतें. ( १८।३५ )

३२ प्रतिवक्तुं प्रकृष्टे हि नापकृष्टस्तु शक्नुयात् ।- श्रेष्ठाच्या पुढें निकृष्ट उत्तर देण्यास समर्थ होत नाहीं. ( १८।४७ )

३३ दण्ड्ये यः पातयेद्दण्डं दण्ड्यो यश्चापि दण्ड्यते। कार्यकारणसिद्धार्थावुभौ तौ नावसीदतः।— जो अपराध्याला दण्ड करतो व ज्या अपराध्याला दण्ड होतो, ते दोघेही कार्यकारण संबंधामुळें पतित होत नाहींत. ( १८।६३ )

३४ नैवं विधाः शेरते हि भूमौ नृपतिसत्तमाः— श्रेष्ठ राजे असे जमिनीवर निजत नसतात. ( २०।५ )

३५ गुणदोषकृतं जन्तुः स्वकर्मफलहेतुकम् । अव्यग्रस्तदवाप्नोति सर्वं प्रेत्य शुभाशुभम् ॥— गुण दोष करणारें शुभाशुभ कर्म जें मनुष्य करतो त्याचें शुभाशुभ फल त्यास प्राप्त होतें ( ५१।२ )

३६ कश्च कस्यानुशोच्योऽस्ति देहेऽस्मिन् बुद्बुदोपमे ।— बुडबुड्यासारख्या या देहाच्या ठिकाणीं कोण कोणाचा शोक करील बरें ? ( २१।३ )

३७ शोच्यः शोचसि कं शोच्यम् ?— स्वतः शोचनीय स्थितींत असलेल्यानें दुसऱ्या कोणाचा शोक करावा बरें ? ( २१।३ )

३८ दीनं दीनोऽनुकम्पसे— स्वतः दीन झाला असतांना दुसऱ्या दीनावर कशी बरें दया करता येईल ? ( २१।३ )

३९ न चातिप्रणयः कार्यः कर्तव्योऽप्रणयश्च ते । उभयं हि महादोषं तस्मादन्तरदृग्भव ॥— अतिप्रसंगही करूं नये व उदासीनही बनूं नये. दोनही अनर्थावह आहेत. म्हणून मध्यम मार्गानें जावें. ( २२।२२ )

४० शूराय न प्रदातव्या कन्या खलु विपश्चिता— शहाण्यामाणसानें आपली मुलगी शूराला देऊं नये. ( २३।८ )

४१ पतिहीना तु या नारी कामं भवतु पुत्रिणी । धनधान्यसमृद्धाऽपि विधवेत्युच्यते बुधैः ॥— जिचा पति मेला आहे ती पुत्रवती व धनधान्यानें समृद्ध असली तरी विधवाच म्हटली जाते. ( २३।१२ )

४२ अनन्यरूपाः पुरुषस्य दाराः— स्त्री पुरुषापासून भिन्न नसते. ( २४।३८ )

४३ न शूरपत्न्यः परिदेवयन्ति— शूरांच्या स्त्रिया रडत नसतात. ( २४।४४ )

४४ धात्रा विधानं विहितं तथैव— विधात्यानें तसेंच व्हावें असें ठरवलें होतें. ( २४।४४ )

४५ सर्वं सुखदुःखयोगं तेन कृतं विधात्रा— सर्व सुख दुःखाचा योग त्याच विधात्यानें केलेला आहे. ( २४।४१ )

४६ न शोकपरितापेन श्रेयसा युज्यते मृत.— शोक संताप करण्यानें मेलेल्या जीवाला शुभगति होत नाहीं ( २५।२ )

४७ लोकवृत्तमनुष्ठेयं— लोक व्यवहाराप्रमाणें वागावें. ( २५।३ )

४८ न कालादुत्तरं किंचित्परं कर्म उपासितुम्— वेळ निघून गेल्यावर कोणतेंही कर्म नीट करता येत नाहीं. ( २५।३ )

४९ नियतिः कारण लोके, नियतिः कर्मसाधनम्। नियतिः सर्वभूतानां नियोगेष्विह कारणम्— जगामध्यें दैवावर सर्व कारणें, सर्व कर्म व सर्व योग अवलंबून आहेत कालच सर्व करतो. ( २५।४ )

५० न कालः कालमत्येति, न कालः परिहीयते। स्वभावं च समासाद्य न कश्चिदतिवर्तते॥— कालाचा अतिक्रम कोणास करता येत नाहीं, घडणाऱ्या गोष्टी आधीं किंवा नंतर घडत नाहींत. प्राक्तनाला टाळता येत नाहीं. ( २५।६ )

५१ न कालस्यास्ति बन्धुत्वं न हेतुर्न पराक्रमः। न मित्रज्ञाति संबंधः कारण नात्मनो वशः॥— काल पक्षपात करीत नाहीं, तो टाळ-ण्यासाठीं उपाय चालत नाहीं तो मित्र व ज्ञातीचा संबंध जाणत नाहीं. त्याच्यावर कोणाचा अधिकार चालत नाहीं. ( २५।७ )

५२ धर्मश्चार्थश्च कामश्च कालक्रमसमाहिताः— धर्म अर्थ व काम हे कालक्रमानें प्राप्त होत असतात ( २५।८ )

५३ एषा वै नियतिः श्रेष्ठा॥— ही कालगति अपरिहार्य आहे. ( २५।११ )

५४ तदलं परितापेन— आता शोक पुरे झाला ( २५।११ )

५५ समुन्मूलय शोकं त्वं व्यवसायं स्थिरीकुरु— शोक टाक व उद्योग कर. ( २७।३७ )

५६ उपकारेण वीरो हि प्रतीकारेण युज्यते— कोणी उपकार केला असता वीर पुरुष त्यावर प्रत्युपकार करतोच. ( २८।६४ )

५७ अकृतज्ञोऽप्रतिकृतो हन्ति सत्त्ववतां मन -उपकार करणाऱ्यावर जो प्रत्युपकार करीत नाही तो कृतघ्न सामर्थ्यवानाचें मन मारून टाकतो, म्हणजे त्याचा मैत्री राहत नाही (२८।६४)

५८ यो हि मित्रेषु कालज्ञ सतत साधु वर्तते । तस्य राज्य च कीर्तिश्च प्रतापश्चापि वर्धते ॥— जो प्रसंग जाणणारा मनुष्य मित्राशी चांगल्या रीतिनें वागतो त्याचें राज्य, कीर्ति व प्रताप याची अभिवृद्धि होते (२९।११)

५९ यस्य कोशश्च दण्डश्च मित्राण्यात्मा च भूमिप । समवेतानि सर्वाणि स राज्य महदश्नुते ॥— कोश, दण्ड, मित्र आणि आत्मबल ही सर्व ज्या या स्वाधीन असतात, तो मोठें राज्य प्राप्त करतो (२९।१२)

६० यो हि कालव्यतीतेषु मित्रकार्येषु वर्तते । स कृत्वा महतोऽप्यर्थान्न मित्रार्थेन युज्यते ॥— वेळ निघून गेल्यावर जो मित्र कार्य करू लागतो, त्यानें कार्य केलें तरी मित्र कार्य केल्याचें यश त्याला मिळत नाही (२९।१५)

६१ नहि तावद्व्यपेतकालो व्यतीतश्चोदनादृते- पुन. सूचना येई पर्यंत कार्याची वेळ गेली असें होत नाही. (२९।२०)

६२ चोदितस्य हि कार्यस्य भवेत्कालव्यतिक्रम. ।— पुन्हा सूचना द्यावी लागली म्हणजे वेळ निघून गेली असें समजावें (२९।१५)

६५ शुभं वा यदि वा पापं योहि वाक्यमुदीरितं । सत्येन परिगृह्णाति स वीरः पुरुषोत्तमः ॥— जो तोंडातून निघालेलें बरेंवाईट भाषण खरें करून दाखवतो तो वीर पुरुषामध्यें उत्तम होय. ( ३०।७२ )

६६ कृतार्था ह्यकृतार्थानां मित्राणां न भवन्ति ये । तान्मृतानपि क्रव्यादा कृतघ्नान्नोपभुञ्जते ॥— आपला मनोरथ सिद्ध झाल्यावरही मित्र कार्यासाठीं जे झटत नाहींत, ते मेले असता त्यांना श्वापदेंही खात नाहींत. ( ३०।७३ )

६७ कोपमार्येण यो हन्ति स वीरः पुरुषोत्तम — उत्तम विवेकानें जो क्रोधाचा नाश करतो तोच वीर पुरुषामध्यें श्रेष्ठ होय ( ३१।६ )

६८ मित्रं त्वस्थानकुपितं जनयत्येव सम्भ्रमम्— मित्र विनाकारण क्रुद्ध झाला तर तोही भीति उत्पन्न करतो. ( ३२।६ )

६९ सर्वथा सुकरं मित्रं, दुष्करं प्रतिपालनम् । अनित्यत्वात्तु चित्तानां प्रीतिरल्पेऽपि भिद्यते ॥— मित्र मिळवणें सोपें आहे, पण मित्रता टिकवणें फार कठिण आहे. कारण अन्तःकरणें स्थिर नसल्यानें अल्पस्वल्प कारणानींहि ती मोडूं शकते. ( ३२।७ )

७० पानाद्‌र्थश्च कामश्च धर्मश्च परिहीयते— मद्यपानकरण्यानें धन, काम व धर्म याचा नाश होतो ( ३३।४६ )

७१ धर्मलोपो महांस्तावत्कृते ह्यप्रतिकुर्वतः— उपकार करणाऱ्या वर प्रत्युपकार केला नाहीं तर धर्माचा लोप होतो ( ३३।४७ )

७२ अर्थलोपश्च मित्रस्य नाशे गुणवतो महान्— गुणवान मित्राची मैत्री तुटणें यानें फारच मोठी अर्थ हानि होते ( ३३।४७ )

७३ मित्रं ह्यर्थगुणश्रेष्ठं सत्यधर्मपरायणम्— कार्य सिद्ध करणारा व सत्य परायण असा मित्र असावा ( ३३।४८ )

**५७ अकृतज्ञोऽप्रतिकृतो हन्ति सत्त्ववतां मनः** उपकार करणाऱ्यावर जो प्रत्युपकार करीत नाहीं तो कृतघ्न सामर्थ्यवानाचें मन मारून टाकतो, म्हणजे त्याची मैत्री राहत नाहीं (२८।६४)

**५८ यो हि मित्रेषु कालज्ञः सततं साधु वर्तते। तस्य राज्यं च कीर्तिश्च प्रतापश्चापि वर्धते॥—** जो प्रसंग जाणणारा मनुष्य मित्राशीं चांगल्या रीतीनें वागतो त्याचें राज्य, कीर्ति व प्रताप यांची अभिवृद्धि होते (२९।११)

**५९ यस्य कोशश्च दण्डश्च मित्राण्यात्मा च भूमिप। समान्येतानि सर्वाणि स राज्यं महदश्नुते॥—** कोश, दण्ड, मित्र आणि आत्मबल हीं सर्व ज्याच्या स्वाधीन असतात, तो मोठें राज्य प्राप्त करतो. (२९।१२)

**६० यो हि कालव्यतीतेषु मित्रकार्येषु वर्तते। स कृत्वा महतोऽप्यर्थान्न मित्रार्थेन युज्यते॥—** वेळ निघून गेल्यावर जो मित्र कार्य करू लागतो, त्यानें कार्य केलें तरी मित्र कार्य केल्याचें यश त्याला मिळत नाहीं (२९।१५)

**६१ नहि तावद्भवेत्कालो व्यतीतश्चोदनादृते—** पुन. सूचना येई पर्यंत कार्याची वेळ गेली असें होत नाहीं. (२९।२०)

**६२ चोदितस्य हि कार्यस्य भवेत्कालव्यतिक्रमः।—** पुन सूचना करावी लागली म्हणजे वेळ निघून गेली असें समजावें (२९।१५)

**६३ न चाग्निचूडां ज्वलितामुपेत्य न दह्यते कश्चित्—** प्रज्वलित अग्निची ज्वाला लागल्यानंतर कोण जळला नाहीं असें होणार नाहीं (३०।१८)

**६४ अर्थिनामुपपन्नानां पूर्वं चाप्युपकारिणाम्। आशां संश्रुत्य यो हन्ति स लोके पुरुषाधमः॥—** ज्यांनीं पूर्वी उपकार केले आहेत व जे कांहीं इच्छेनें आले आहेत, त्यांना वचन देऊन जो त्या प्रमाणें वागत नाहीं, तो नीच पुरुष आहे असें समजावें. (३०।७१)

६५ शुभं वा यदि वा पापं योहि वाक्यमुदीरितं । सत्येन परि गृह्णाति स वीरः पुरुषोत्तमः ॥— जो तोंडातून निघालेलें बरेंवाईट भाषण खरें करून दाखवतो तो वीर पुरुषामध्यें उत्तम होय. ( ३०।७२ )

६६ कृतार्था ह्यकृतार्थानां मित्राणां न भवन्ति ये । तान्मृतानपि क्रव्यादाः कृतघ्नान्नोपभुञ्जते ॥— आपला मनोरथ सिद्ध झाल्यावरही मित्र कार्यासाठीं जे झटत नाहींत, ते मेले असता त्यांना श्वापदेंही खात नाहींत. ( ३०।७३ )

६७ कोपमार्येण यो हन्ति स वीरः पुरुषोत्तम — उत्तम विवेकानें जो क्रोधाचा नाश करतो तोच वीर पुरुषामध्यें श्रेष्ठ होय ( ३१।६ )

६८ मित्रं त्वस्थानकुपितं जनयत्येव संभ्रमम्- मित्र विनाकारण क्रुद्ध झाला तर तोही भीति उत्पन्न करतो. ( ३२।६ )

६९ सर्वथा सुकरं मित्रं, दुष्करं प्रतिपालनम् । अनित्यत्वात्तु चित्तानां प्रीतिरल्पेऽपि भिद्यते ॥— मित्र मिळवणं सोपें आहे, पण मित्रता टिकवणें फार कठिण आहे. कारण अन्तःकरणें स्थिर नसल्यानें अल्पस्वल्प कारणानींहि ती मोडूं शकते. ( ३२।७ )

७० पानादर्थश्च कामश्च धर्मश्च परिहीयते— मद्यपानकरण्यानें धन, काम व धर्म यांचा नाश होतो ( ३३।४६ )

७१ धर्मलोपो महांस्तावत्कृते ह्यप्रतिकुर्वतः— उपकार करणाऱ्या वर प्रत्युपकार केला नाहीं तर धर्माचा लोप होतो ( ३३।४७ )

७२ अर्थलोपश्च मित्रस्य नाशे गुणवतो महान्— गुणवान मित्राची मैत्री तुटणें यानें फारच मोठी अर्थ हानि होते ( ३३।४७ )

७३ मित्रं ह्यर्थगुणश्रेष्ठं सत्यधर्मपरायणम्— कार्य सिद्ध करणारा व सत्य परायण असा मित्र असावा ( ३३।४८ )

७४ सत्वाभिजनसंपन्नः सानुक्रोशो जितेन्द्रियः। कृतज्ञः सत्यवादी च राजा लोके महीयते ॥— सत्वस्थ, कुलीन, दयाळू, जितेंद्रिय, कृतज्ञ, सत्यवादी राजाची या लोकीं कीर्ति वाढत जाते. (३४।७)

७५ यस्तु राजा स्थितोऽधर्मे मित्राणामुपकारिणाम्। मिथ्याप्रतिज्ञां कुरुते को नृशंसतरस्ततः ॥— जो राजा अधर्माचरण करतो व उपकार करणाऱ्या मित्रांना खोटें वचन देऊन फसवितो त्याहून अधिक दुष्ट कोण बरें असेल? (३४।८)

७६ कृतघ्ने नास्ति निष्कृतिः ॥— कृतघ्नाला प्रायश्चित्त नाहीं. (३४।१२)

७७ विधिः किल नरं लोके विधानेनानुवर्तते— खरोखर कर्माचें फल दैवी घटनेनुसार मनुष्याला प्राप्त होत असतें (५६।४)

# किष्किन्धाकांडांतील
# उपमा

---

१ हाटकप्रतिच्छन्नान् नरान् पीतांबरानिव— सुवर्ण भूषणें घातलेल्या पीतांबरधारी पुरुषाप्रमाणें ( हे वृक्ष दिसत आहेत. ) कि० १।०१

२ विभ्रमोत्सिक्तमनसः सांगरागा नरा इव— शृंगारानें आनंदित मन ज्याचें झालें आहे व ज्याच्या अंगाला चंदनाची उटी लावलेली अशा पुरुषाप्रमाणें ( हे वृक्ष दिसत आहेत ) ( १६० )

३ निःश्वास इव सीताया वाति वायुर्मनोहरः— सीतेच्या श्वासोच्छ्वासाप्रमाणें हा मनोहर वायु वहात आहे. ( १।७२ )

४ द्रुमान् इमान् लताः समनुवर्तन्ते मत्ता इव वरस्त्रियः— या वृक्षांना मत्त झालेल्या श्रेष्ठ स्त्रियाप्रमाणें या लता वेली चिकटून राहत आहेत. ( १।८५ )

५ पुष्पैः नगसानुषु विस्तीर्णाः पीतरक्ताभाः प्रस्तराः कृताः— फुलानीं पर्वतावर लाल व पिवळ्या रंगाचें पसरलेले थर निळाने पसरले आहेत असें दिसत आहेत. ( १।९१ )

६ भाराक्रान्तेव नौर्जले मज्जति– भार अधिक झालेली नौका जशी पाण्यात बुडते ( तसा मनुष्य शोकात बुडतो. ) ( ८।१० )

७ वर्षास्विव सुक्षेत्रे सर्वं संपद्यते— पर्जन्य कालामध्यें उत्तम जमिनींत पेरलेलें बीज उत्तम रीतिनें उगवतें. ( ८।२० )

८ वाष्पवेगं तु सहसा नदीवेगमिवागतं— नदीचा वेग जसा अनावर असतो तसा अश्रूंचा वेग अनावर असतो ( ८।३० )

९ अमर्षः प्रर्धते प्रावृड्वेग इवांभस — माझा क्रोध पावसाळ्यात पाण्याचा जोर वाढतो तसा वाढत आहे.

१० युगान्त इव भास्करः— युगाचा अन्त करणारा जसा सूर्य असतो. ( ११।२ )

११ गगने ग्रहयोर्घोरं बुधाङ्गारकयोरिव— आकाशामध्ये बुध व मंगळ याचें घोर युद्ध व्हावें ( तसें त्याचें युद्ध झालें. ) ( १२।१७ )

१२ अन्योन्यसदृशौ वीरावुभौ देवाविवाश्विनौ— अश्विनी कुमाराप्रमाणें ते दोघेही वीर सारख दिसूं लागले ( १२।१९ )

१३ मालयेव बलाकानां ससंध्य इव तोयदः— संध्याकाळचा मेघ बगळ्याच्या माळेनें जसा शोभतो ( तद्वत् तो सुग्रीव त्या माळेनें शोभूं लागला. ( १२।४१ )

१४ पर्वतानिव जंगमान्— चालणाऱ्या पर्वतासारखे ( हत्ती त्या वनात होते. ) ( १३।११ )

१५ एष मेघ इव आकाशे वृक्षषण्डः प्रकाशते— ह्या आकाशातील मेघाप्रमाणें हा वृक्ष समूह चमकत आहे. ( १३।१४ )

१६ मेघजालप्रतिच्छन्ना वैडूर्यगिरयो यथा— मेघानीं आच्छादिलेल्या वैडूर्य रत्नाच्या पर्वताप्रमाणें ( हे वृक्ष दिसत आहेत ) ( १३।२४ )

१७ विपरीत इवाकाशे सूर्यो नक्षत्रमालया— नक्षत्र माळेनें वेष्टिलेला सूर्य जसा आकाशात शोभतो ( तसा सुग्रीव त्या वेलीनें शोभला ) ( १४।९ )

१८ राजदोषपरामृष्टाः कुलस्त्रिय इवाकुलाः— राजाच्या दोषामुळें कुलस्त्रिया शत्रुच्या ताब्यात गेल्यामुळें जशा व्याकुळ होतात. ( १४।२० )



समाप्त